


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)







महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.**

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

# नवभारत

वर्ष ११ वें ] डिसेंबर १९५७ [ अंक ३



वार्षिक वर्गणी ९ रु. ] [ किरकोळ अंक १ रु.

अनुक्रमणिका






प्राज्ञपाठशाळामंडळ वाई, यांचें मासिक

वर्ष अकरावें
अंक तिसरा

# नवभारत

डिसेंबर
१९५७

संपादक-मंडळ
आचार्य स. ज. भागवत–श्री. हरि कृष्ण मोहनी–प्रा. वि. म. बेडेकर
प्रा. गोवर्धन पारीख का. संपादक



वार्षिक रु. ९ सहामाही रु. ५ अंकास रु. १

हें मासिक श्री. म. शं. साठे यांनीं दी प्राज्ञ प्रेस, ३१५ गंगापुरी, वाई येथें छापून प्रा. वि. म. बेडेकर यांनीं प्राज्ञपाठशाळामंडळ वाई यांचेंकरितां तेथेंच प्रसिद्ध केलें.

पत्रव्यवहाराचा पत्ता : १ संपादकीय : कार्यकारी संपादक, ‘नवभारत’ मासिक,
४४६ शीव रोड, मुंबई १९

२ व्यवस्थापकीय : व्यवस्थापक, ‘ नवभारत ’ मासिक,
C/o प्राज्ञ प्रेस, वाई ( जि. सातारा )








# 'नवभारत' मासिक, डिसेंबर १९५७

## —लेखक-परिचय—

[ खालीं दिलेल्या लेखकांशिवाय, या अंकांतील इतर लेखकांचा परिचय या वर्षीं यापूर्वी त्यांचे लेख आले त्या वेळीं दिला आहे.– का. सं. ]

**श्री. प्र. रा. देशमुख :** यवतमाळ येथें वकील; " The Indus Civilisation in the Ṛgveda " या पुस्तकाचे लेखक.

**प्रा. सदाशिव आठवले :** कोल्हापूर येथील राजाराम कॉलेजांतील इतिहासाचे प्राध्यापक.

**प्रा. व. म. परांजपे :** मुंबई येथील रामनारायण रुइया कॉलेजांतील इंग्रजीचे प्राध्यापक.

**श्रीमती सत्यबाला तायल :** पंजाबमधील प्रसिद्ध भूदान कार्यकर्त्या; विविध रचनात्मक कार्यक्षेत्रांत महत्त्वाचें कार्य.

**श्री. श्री. शं. नवरे :** मुंबई येथील प्रसिद्ध पत्रकार, सामाजिक व साहित्यिक क्षेत्रांतील नाणावलेले कार्यकर्ते.

**श्री. वसंत पळशीकर :** पुणें येथील " भूदान " या इंग्रजी पत्राचे सहसंपादक.

**श्री. शं. वि. वैद्य :** मुंबई येथील एल्फिस्टन कॉलेजांतील मराठीचे प्राध्यापक.

**प्रा. वि. म. बेडेकर :** 'नवभारता'चे एक संपादक.

---

श्री. प्र. रा. देशमुख

# आर्यांचे शत्रू

## आर्यांच्या पूर्वीचे सुसंस्कृत भारतीय

आर्यांनीं भारतांत प्रवेश केला त्यावेळीं भारताची स्थिति कशी होती, तेथें कोण लोक रहात होते, ते सुसंस्कृत होते कीं रानटी होते, याबद्दल बराच गैरसमज प्रचलित होता आणि आहेहि. आर्यांनीं भारतांत प्रवेश केला त्यावेळीं तेथें नांव घेण्यासारखी कोणतीहि संस्कृति नव्हती, तेथील रहिवाशी रानटी व मागासलेले होते, ते आर्यांच्या गायी वगैरे चोरून नेत व त्यांच्या पुढें सरकण्याचे मार्गांत अडथळे निर्माण करीत. आर्यांनीं त्यांची कत्तल करून भारतास संस्कृति दिली इत्यादि अत्यंत चुकीच्या आणि निराधार कल्पना, सामान्य लोकांतच नव्हे तर कांहीं विद्वानांत देखील रूढ असलेल्या दिसतात. ऋग्वेद हें भारतांतील सर्वांत जुनें इतिहासाचें वाङ्मयीन साधन आहे. ऋग्वेदावरून स्वतंत्रपणें आणि ऋग्वेद व सिंधु संस्कृतीच्या तौलनिक अभ्यासावरून ह्या कल्पना अत्यंत चुकीच्या आणि निराधार आहेत हें दिसेल.

आर्यांनीं सप्तसिंधूंच्या प्रदेशांत प्रवेश केल्यानंतर तेथें त्यांचे दास आणि दस्यू नांवांनीं संबोधिलेल्या लोकांशीं दीर्घकालपर्यंत संघर्ष झाले. हे लोक समृद्ध असून त्यांचीं शहरांचीं राज्यें होतीं. ते सभोंवतीं तटबंदी व दरवाजे असलेल्या ‘ पुर ’ नांवाच्या शहरांत रहात असत. त्यांचे मुख्य धंदे शेती, व्यापार व मोठमोठीं बांधकामें करणें हे होते. ते धनधान्य समृद्ध असून सोनें, रुपें, मौल्यवान दगड इत्यादींची अगणित संपत्ती त्यांच्याजवळ होती. त्यांच्याजवळ गोधनहि विपुल होतें. हे लोक आर्यांपेक्षां जास्त सुसंस्कृत होते; परंतु स्वभावानें शांत, भित्रे व युद्ध कौशल्यांत व शस्त्रास्त्रें तयार करण्याचे कामांत बरेच मागासलेले असल्यामुळें आर्यांपुढें त्यांचा टिकाव लागला नाहीं व त्यांची समृद्ध शहरांची संस्कृति धुळीस मिळाली.

## दास–दस्यू

आर्यांच्या शत्रूंना ऋग्वेदांत दास, दस्यू, पणिः, अव्रत, अयज्वनः, असुन्वतः, शिश्नदेवाः, मूराः, मूरदेवाः, यातुधानाः, यातवः इत्यादि अत्यंत तुच्छतादर्शक नांवांनीं संबोधिलें आहे. हीं नांवें स्थलवाचक अथवा मानववंश दर्शक नाहींत.

दास आणि दस्यू या दोन्ही शब्दांचा निश्चित अर्थ सांगणें कठीण आहे. सामान्यतः आर्य या शब्दाचा अर्थ जेता असा असून त्याच्या उलट दास या शब्दाचा अर्थ जित असा समजला जातो. दास आणि दस्यू हे दोन्ही शब्द ऋग्वेदांत आर्यांचे शत्रूनिदर्शक असून त्यांत दुसरा कोणताहि अर्थ अभिप्रेत नाहीं. दास आणि दस्यू हे शब्द प्राथमिक आर्यांच्या भारतांतील शत्रुवर्गाला, त्यांतील कोणत्याहि व्यक्तीला अथवा त्यांच्या देवांना उद्देशून योजिले आहेत असें ऋग्वेदांतील त्यांच्या उपयोगावरून दिसून येतें. ऋचा १०-९९-६ मध्यें आर्यपूर्व लोकांच्या तीन तोंडांच्या शिंगें धारण करणाऱ्या देवाला ‘ दास ’ असें संबोधिलें आहे.

दास या शब्दाचा अर्थ सायणाचार्यांनें ‘ दासाः अस्मदुपक्षपयितारः,’ १-१५८-५ म्हणजे ‘ आमचेकडून उपक्षय केला जाण्यास योग्य ’ असा दिला आहे. दस्यू या शब्दाचा अर्थ देखील ‘ दस्यवः उपक्षपयितारः शत्रवः ’ म्हणजे ‘ उपक्षय केला जाण्यास योग्य ’ असाच दिला आहे. दोन्ही शब्द








'दसु उपक्षये' या धातुवरून सिद्ध केले असून समानार्थी आहेत. त्या दोन्ही शब्दांचा अर्थ नेस्तनाबूद करून टाकण्यास योग्य असावा असें दिसतें. कांहीं विद्वानांच्या मतें दास हा शब्द कास्पिअन समुद्राच्या तीरावर राहणाऱ्या प्राचीन 'दाह' नांवाच्या लोकांच्या नांवावरून आला असावा. इराणी शब्द 'दह्यू' परशिअन शब्द 'दिह' व उर्दू शब्द 'देहात' म्हणजे खेडेगांव या अर्थी वापरलेल्या शब्दांचाहि प्राचीन 'दाह' शब्दाशीं संबंध असावा व त्यावरूनच दास आणि दस्यू हे शब्द आले असावे असा तर्क आहे. परंतु शब्दसादृश्यापलीकडे 'दास' आणि 'दाह' यांना जोडणारें दुसरें कोणतेंहि कारण दिसत नाहीं. ऋग्वेदांत वर्णन केलेले आर्यांचे शत्रू 'दास' अथवा 'दस्यू' हे समृद्ध शहरांत राहणारे लोक असून त्यांचा खेडेगांवाशीं कोणताहि संबंध असल्याचें दिसत नाहीं. दुसरें कास्पिअन समुद्राच्या तीरावर राहणाऱ्या प्राचीन 'दाह' लोकांचा व भारतांतील दासांचा कोणत्याहि प्रकारचा संबंध असल्याचें दिसत नाहीं. शिवाय आर्यांनीं कास्पिअन समुद्राच्या तीरावरील आपल्या शत्रूंचें नांव आपणाबरोबर आणून तें भारतांतील शत्रूंना लावलें असें म्हटलें तर तेंहि बरोबर नाहीं. कारण ऋग्वेदांत संकलित केलेल्या ऋचा नूतन ऋषींनीं, आर्यांनी भारतांत प्रवेश केल्यानंतर अनेक शतकांनीं रचल्या त्यावेळीं त्यांना प्राथमिक आर्य कोठून आले, त्यांचे भारताबाहेर कोणाशीं संघर्ष झाले, त्यांचे भारताबाहेरील शत्रू कोण होते इत्यादींबद्दल कोणत्याहि प्रकारची माहिती असल्याचें ऋचावरून दिसत नाहीं. भारताबाहेरील कोणत्याहि भूप्रदेशाचें अथवा लोकांचें वर्णन ऋचांतून नाहीं. ऋचाकार भारतासच आपला देश समजत होते असें दिसतें. अशा परिस्थितींत थोडेसें नामसादृश्य दिसतें म्हणून दासांचा दाहलोकांशीं संबंध जोडणें अथवा 'दाह' लोकांच्या नांवावरून दास शब्द आला असें म्हणणें सयुक्तिक होणार नाहीं.

दास आणि दस्यू ह्या दोन्ही शब्दांचा दाह या शब्दाशीं संबंध असण्याची शक्यता आहे पण ती अगदीच वेगळ्या अर्थी. 'दास' आणि 'दस्यू' यांचीं मुळचीं रूपें 'दाह' आणि 'दह्यू' असून ते दोन्ही शब्द 'दह' म्हणजे जाळणें या धातूवरून झाले असण्याची शक्यता बरीच आहे. आर्यांचे दासांशीं जे संघर्ष झाले त्यांत शत्रू, शत्रूंचे प्रदेश व त्यांची शहरें जाळण्यासाठीं आर्यांनीं अग्नीचा फार मोठ्या प्रमाणावर उपयोग केला. 'दास' आणि 'दस्यू' हे समानार्थी शब्द असून दोन्हींचा अर्थ मुळांत 'जाळून टाकण्यास योग्य' असा असावा. पुढें ते आर्यांचे शत्रू या सामान्य अर्थी वापरलेले दिसतात.

वर निर्देशिलेल्या आर्यांच्या शत्रूंच्या नांवांपैकीं सामान्यतः उपयोगांत आणलेलीं दास आणि दस्यू हीं नांवें सोडून बाकीचीं सर्व नावें विशेषणात्मक (connotative) आहेत हें दिसून येईल.

## जलमार्गानें व्यापार करणारे पणि लोक

दास आणि दस्यू यांच्या खालोखाल आर्यांच्या शत्रूचा निदर्शक 'पणिः' हा शब्द आहे. 'पणिः' हा शब्द उपहासात्मक असून ऋग्वेदांतील सर्व मण्डळांतून आला आहे. 'पणिः' या शब्दाचा अर्थ यास्कानें निरुक्तांत 'पणिर्वणिग्भवति, पणिः पणानात्, वणिक् पण्यं नेनेक्ति।' असा दिला असून सायणाचार्यानें देखील 'पणयः वणिजः' पणि म्हणजे वाणी असाच अर्थ दिला आहे. ऋचांतील वर्णनावरूनहि 'पणी' हे समृद्ध व्यापारी होते असें दिसतें. पणी व्यापारी किती दूरवर व्यापार करीत होते आणि त्यांच्या व्यापाराचें स्वरूप काय होतें याबद्दल ऋचांतून विशेष माहिती मिळत नाहीं.

पणीबद्दल ऋचांतून जी माहिती मिळते ती अशीः—पणी 'पुर' नांवाच्या मजबूत तटबंदींच्या शहरांत राहत असून ते धन, धान्य, गायी, सोनें, रुपें, मौल्यवान् दगड इत्यादींच्या अगणित संपत्तीनें



अनुक्रमणिका






व विलासाच्या आणि उपभोगाच्या वस्तूंनीं समृद्ध होते. त्यांचीं घरें विस्तृत होतीं. कांहींचें वर्णन तर 'शतदुर्' म्हणजे शंभर दरवाजे असलेले असें केलें आहे. त्यांच्याजवळ धान्याचीं फार मोठीं कोठारें होतीं. पणींचे मुख्य धंदे शेती, व्यापार, पशुधनाची जोपासना व मोठमोठीं बांधकामें करणें हीं होत. पणी नद्यांचे प्रवाह अडवून आणि वळवून त्यांचे अनेकविध उपयोग करण्यांत निष्णात होते असें दिसतें. नद्यांच्या तीरावर त्यांची 'उर्वर' आणि 'क्षेत्र' नांवाचीं सुपीक शेतें असून त्यांतून ते कालव्यांच्या साहाय्यानें पिकेंहि मोठ्या प्रमाणावर काढीत. त्यांचीं शहरें बहुधा नद्यांच्या काठावर बांधलीं जात असत. नद्यांचें पाणी येऊं नये म्हणून तीं बहुधा जमीन उंच करून बांधलीं जात असावीं. हीं शहरें बांधण्यांत, नद्यांच्या पाण्याचे शहरांच्या सर्व बाजूंनीं खंदक काढून शत्रूंना हल्ला करण्यास कठीण जावें, नदींतून व्यापार करतां यावा, इत्यादि अनेक उद्देश असावे. 'कुयव' नांवाच्या पणींच्या राजाच्या निवासस्थानाचें वर्णन ऋचा १–१०४–४ मध्यें आहे. त्या ऋचेचा अर्थ असा: "पाण्यांत राहून त्रास देणाऱ्या कुयवाचें निवासस्थान गूढ होतें, भरलेल्या पाण्यांतून तो शूर राजा तरून जात असे. अञ्जसी, कुलिशी आणि वीरपत्नी ह्या प्रसन्न मनानें पाणी देणाऱ्या तीन नद्या आपल्या उदकानें त्याचें पोषण करीत होत्या." कुयवाच्या निवासस्थानाचें रक्षण करणाऱ्या नद्यांचीं नांवें पाहिलीं म्हणजे आपल्या नगराचा शत्रूपासून बचाव करण्यासाठीं पणी नद्यांचा उपयोग करून घेत होते हें स्पष्ट दिसतें. अञ्जसी म्हणजे युद्ध करणारी ( अञ्जस म्हणजे संग्राम, १–१३२–२ ), कुलिशी म्हणजे वज्राप्रमाणें तीक्ष्ण आणि वीरपत्नी म्हणजे वीरांचें रक्षण करणारी. हीं नद्यांचीं खरीखुरीं नावें नसून कुयवाच्या निवासस्थानापासून जाणाऱ्या शफा नदीच्या तीन शाखांचीं नांवें असावीं. पणींनीं अडविलेले नद्यांचे प्रवाह पणींना मारून मोकळे केले अशीं वर्णनें ऋग्वेदांत अनेक आहेत. त्यांचेंहि स्वारस्य वरील विवेचनावरून लक्षांत येईल. ऋग्वेदांतील सर्वश्रेष्ठ नदी सरस्वती. सरस्वती म्हणजे सिंधू कांहीं विद्वान् समजतात त्याप्रमाणें राजपुतान्यांतील सुकलेली सरसुती नदी नव्हे. सहाव्या मंडळांतील संपूर्ण एकसष्टावें सूक्त ह्या श्रेष्ठतम नदीच्या स्तुतिपर आहे. ऋचा ६–६१–१४ मध्यें सरस्वतीनें वध्र्यश्वाला प्रसिद्ध दिवोदास नांवाचा मुलगा दिल्याबद्दल स्तुति आहे. दिवोदासानें आपमतलबी पणींना मारून टाकून सरस्वतीला त्यांच्या दास्यांतून सोडविलें. पणी सरस्वतीपासून अनेक फायदे करून घेत होते परंतु त्यांच्या मोबदल्यांत त्या श्रेष्ठतम नदीला कांहींहि देत नव्हते. वरील ऋचेवरून पणींचीं नुसतीं शहरेंच नद्यांचे काठीं होतीं असें नव्हे तर ते नद्यांतून विशेषत: सिंधू नदींतून लांबवर व्यापार करीत असावे असें दिसतें. ऋग्वेदकालीं नद्यांतून व्यापार करणें ही अत्यंत सामान्य गोष्ट होती. ऋग्वेदांतून ज्यांच्यांतून नावा चालतात अशा नद्यांबद्दल "नाव्या:" ( नावा तार्या: नदी: ) १-८०-८; १-३३-११; १-१२१-१३ असा शब्द अनेक वेळां आला आहे. "नाव:" शब्द तर ऋग्वेदांतून सर्व मण्डळांतून एकंदर चाळीस वेळां आला आहे. ऋचा ५-५९-२ मध्यें मरुतांच्या भीतीनें कांपणाऱ्या पृथ्वीला मालानें भरलेल्या पाण्यावर तरंगत असलेल्या नौकेची उपमा दिली आहे. 'पणि:' हा प्राकृत शब्द आणि 'वणिक्' हा संस्कृत शब्द हे व्यापारी या अर्थी असलेले दोन्ही शब्द परस्परावलंबी व एकाच अर्थी आहेत. यास्कानें निरुक्तांत 'पणय: वणिज:' असा अर्थ दिला आहे हें वर आलेंच आहे. परंतु त्यापासून शब्दाच्या व्युत्पत्तीबद्दल विशेष बोध होत नाहीं. 'पण' आणि 'वण' हे व्यापार करणें या अर्थी असलेले दोन्ही शब्द मुळांत जलवाचक










आहेत. 'पणि:' आणि 'वणिक्' या दोन्ही शब्दांचा अर्थ मुळांत पाण्यावरून मालाचा व्यापार करणारा असा असावा. 'पण' आणि 'पणि:' हे शब्द प्राकृत व जास्त जुने असून त्यावरून 'वन' आणि 'वणिक्' हे समानार्थी संस्कृत शब्द झाले असावे. दास, दस्यू, पणी इत्यादि भारतांतील आर्यांचे शत्रू व सिंधू नदीचे खोऱ्यांत ज्यांची संस्कृति उपलब्ध झाली ते हरप्पा संस्कृतींतील लोक एकच होत हें प्रस्तुत लेखकानें इतरत्र[1] दाखविलें आहे. सिंधु घाटाचे खापराचे शिक्के सुमेरमध्यें सांपडले आहेत त्यावरून असें साधार अनुमान केलें जातें कीं, 'पणी' हे व्यापारी असून त्यांचा दूरवर सुमेर-पर्यंत व्यापार होता. ऋग्वेदावरूनहि स्वतंत्रपणें हीच गोष्ट सिद्ध होते. पणी जलमार्गानें तसेंच जमिनी-वरूनहि व्यापार करीत असावे. आर्य लोक वाटमार करून त्यांचे काफले लुटत असावे. तसेंच ते शह-रांत सांठवून ठेवलेलें धान्य देखील लुटत असावे. ऋचांतून 'अर्कसाता' आणि 'वाजसाता' म्हणजे अन्न लुटण्यासाठीं युद्धाचा प्रामुख्यानें उल्लेख आहे. ऋचा ६-२०-४[2] मध्यें कुत्सानें अन्न लुटण्यासाठी शुष्णाशीं केलेल्या संग्रामाचें वर्णन आहे. त्या ऋचेचा अर्थ असा 'हे इन्द्रा प्राज्ञ दशोणासाठीं (कुत्सासाठीं) अन्न लुटण्याचे संग्रा-मांत पणी शतश: पळाले. भरलेल्या शुष्णाचीं माया आणि अन्न ह्यांपैकीं शस्त्रांनीं कांहींहि यत्किंचित् देखील उरूं दिलें नाहीं. ६-२०-४"

## सुसंस्कृत पणींचा नि:पात करणारे लुटारू वैदिक आर्य

सिंधु खोऱ्यांतील उत्खननांत हरप्पा आणि मोहेंजोदारो या दोन्हीहि शहरांत धान्याचीं कोठारें सांपडलीं आहेत. आर्यपूर्व लोकांचे शहरांतहि धान्याचे साठे असत आणि आर्य तीं लुटण्यासाठीं स्वाऱ्या करीत असत हें 'वाजसाता' आणि 'अर्कसाता'च्या ऋचांतील वर्णनावरून स्पष्ट दिसतें. 'वाजसाता' म्हणजे धान्य लुटण्यासाठीं युद्ध. हा शब्द ऋग्वेदांतून सर्व मण्डळांतून एकूण ब्याहत्तर वेळां आला आहे. ह्याच अर्थाचा 'अर्क-साता' हा शब्द तीन वेळां आला आहे. धान्य लुटण्यासाठीं आर्य आपल्या शत्रूवर हल्ले करीत असत अशीं वर्णनें ऋग्वेदांत अनेक आहेत. ऋग्वेदांवरून स्वतंत्रपणें व सिंधू खोऱ्यांतील उत्ख-ननावरूनहि आर्यपूर्व लोकांचे धान्याचे मोठे साठे असत आणि ते लुटण्यासाठीं आर्य स्वाऱ्या करीत असत ही गोष्ट शाबीत होते.

कांहीं विद्वान् पणी हे दासापासून कोणी तरी वेगळया जातीचे लोक होते असें मानतात. परंतु तसें मानण्यास कांहींहि पुरावा नाहीं. वर दर्शविल्या-प्रमाणें 'दास' आणि 'दस्यू' हे आर्यांच्या शत्रूंचे निदर्शक सर्वसामान्य शब्द आहेत. त्यांपैकीं व्यापार करणाऱ्या वरच्या दर्जाच्या श्रीमान् आणि समृद्ध व्यापारी शत्रूंचा पणी म्हणून उल्लेख केला आहे. ऋचा ७-६-३[3] वरून ही गोष्ट उघड होईल. त्या ऋचेचा अर्थ असा "यज्ञ न करणाऱ्या, कर्णकटू बोलणाऱ्या, श्रद्धारहीत, अग्नीची स्तुति न करणाऱ्या प्रथम असलेल्या पणी-दस्यूंना अग्नीनें शेवटचें केलें. ७-६-३." ह्या ऋचेवरून पुष्कळ महत्वाच्या गोष्टी दिसून येतील. 'दास' आणि 'दस्यू' हे आर्यांच्या शत्रूंचे निदर्शक सामान्य शब्द असून त्यांतील व्यापार करणाऱ्या शत्रूंना पणी म्हटलें आहे. दुसरी गोष्ट, पणी यज्ञ न करणारे,

1 'The Indus civilisation in the Ṛgveda' या पुस्तकांत.

२ शतैरपद्रन्पणय इन्द्राय दशोणये कवयेऽर्कसातौ ।
वधैः शुष्णस्याशुषस्य मायाः पित्वो नारिरेचीत्किंचन प्र ॥ ६-२०-४

३ न्यक्रतून्ग्रथिनो मृध्रवाचः पणीँरश्रद्धाँ अवृधाँ अयज्ञान् ।
प्रप्र तान्दस्यूँरग्निर्विवाय पूर्वश्चकारापराँ अयज्यून् ॥ (७-६-३)



अनुक्रमणिका







हवनासाठीं अग्नी न पेटविणारे, आर्यांच्या देवावर श्रद्धा नसलेले, आर्यांपेक्षां सर्वस्वी वेगळे लोक होते. कांहीं विद्वानें समजतात त्याप्रमाणें पणी ही आर्यांची एक जात असावी असें मानण्यास विलकुल जागा नाहीं. वरील ऋचेंतून दिसणारी सर्वांत महत्त्वाची गोष्ट म्हणजे पणी हे सर्वांत प्रथम होते, अग्नीनें त्यांना शेवटचे केले. पणी सर्व प्रकारच्या संपत्तींनीं, उपभोगाच्या आणि विलासाच्या वस्तूंनीं समृद्ध अशा तटबंदींच्या शहरांत राहणारे व्यापारी होते. त्यांच्या तटबंदीच्या पुरांबद्दल तपशिलवार विवेचन प्रस्तुत लेखकानें अन्यत्र[5] केलें आहे. आर्यांनीं अग्नीच्या साहाय्यानें त्यांची तटबंदीच्या शहरांची समृद्ध संस्कृति नष्ट करून त्याला देशोधडीस लावलें ही गोष्ट वरील ऋचेंतून स्पष्ट होते.

ऋग्वेदांतील दहाव्या मण्डळांतील एकशेंआठाव्या सूक्तांत देवशुनी सरमा आणि पणी यांचा काल्पनिक संवाद वर्णिला आहे. त्यांतील कल्पना अशी आहे कीं, पणींनीं अंगीरांच्या गायी चोरल्या आणि अज्ञात स्थळीं नेऊन ठेवल्या आणि सरमेनें त्या शोधून काढल्या. त्या वेळीं पणी आणि सरमा यांचा संवाद झाला. त्यांत सरमेनें इन्द्राची थोरवी गाइली आहे. वास्तविक पणी समृद्ध व्यापारी असून अंगीरानींच त्यांच्या गायी वळवून नेल्या हें ऋचा १-८३-४ वरून आणि त्याच अर्थाच्या अनेक ऋचावरून स्पष्ट होईल. ऋचा १-८३-४[६] चा अर्थ असा " अङ्गिरांनीं प्रथम अन्न संपादन केलें, नंतर पेटलेल्या सुंदर चुड्या घेऊन पणींचे घोडे, गायी, पशु ( इत्यादि ) सर्व उपभोग्य वस्तू मिळविल्या. १-८३-४ " दशम मण्डळांतील देवशुनी सरमा आणि पणी यांच्या संवादाच्या ऋचा पणींची संस्कृति नष्ट झाल्यावर अनेक शतकानंतर रचल्या गेल्या[७]. त्या वेळीं काळाच्या दूरपणामुळें अङ्गिरांना काल्पनिक स्वरूप व पूज्यत्व प्राप्त झालें होतें. पणी आणि अङ्गिरा यांच्यामधील युद्धाचें खरें स्वरूप लोकांच्या माहितींतून नाहींसें झालें होतें असें दिसतें.

## पराभूत परंतु समृद्ध अशा पणींपासून दान घेणारे आर्य

प्राथमिक आर्यांचे पणींशी झालेल्या संघर्षांचे वर्णन करतांना ऋचांतून त्यांच्याबद्दल द्वेष आणि तिरस्कार दिसतो. त्याचें स्वरूप लक्षांत यावें म्हणून

4 The above brief discussion may lead one to hold that there is some evidence to believe that the inhabitants of the ancient Indus Valley fortified cities were probably Aryans holding different views as to ritual and worship from those of the Ṛgvedic people. ( M. M. P. V. Kane's Presidential address, Indian History Congress; 16 th Session at Waltair, Page. 22. )

५ ' नवभारत ' १९५६ च्या सप्टेंबर अंकांतील ' सिंधू उत्खननांतील शहरें व ऋग्वेदांतील पुरें ' या लेखांत.

६ आदङ्गिराः प्रथमं दधिरे वय इद्धाग्नयः शम्या ये सुकृत्यया ।
सर्वं पणेः समविन्दन्त भोजनमश्वावन्तं गोमन्तमा पशुं नरः ॥ ( १-८३-४ )

७ हें प्रस्तुत लेखकानें नवभारतांतील सन १९५७ च्या जून महिन्याचे ' प्राचीन भारतीय इतिहास व ऋग्वेद ' या लेखांत दाखविलें आहे.

दोन ऋचा उद्धृत केल्या आहेत. ऋचा ५–३४–७[८] चा अर्थ असा: " इन्द्र पणींच्या उपभोग्य वस्तू चोरण्यासाठीं जातो ( आणि त्याचें ) सुंदर-धन यज्ञ करणाऱ्या ( आर्यांत ) वाटून देतो. हवि देऊन ज्यांनीं त्याचें बल उफाळून दिलें त्या सर्वांना ( त्यानें ) प्रवेश करण्यास कठीण अशा ( पुरांत ) स्थायिक केलें ( ५–३४--७ ). " ऋचा ६–३३–२[९] चा अर्थ असा: " हे इन्द्रा तुलाच विविध स्तुतींनीं आर्यप्रजा शूरांशीं होणाऱ्या युद्धांत रक्षणासाठीं आवाहन करतात. तूंच वेदपाठकाकडून पणींना ठार केलेंस. तुझ्या रक्षणानें ( अन्न लुटण्याचे युद्धांत ) जाणारांना अन्न प्राप्त झालें (६–३३–२). " पणीसंबंधीं ऋग्वेदांतील बहुतेक वर्णनें ह्याच स्वरूपाचीं आहेत. असें जरी असलें तरी कांहीं ऋचांतून आर्य स्तोते पणींशीं मैत्री संपादन करण्याचा प्रयत्न करीत असलेलेहि दृष्टीस पडतात. ऋग्वेदांतील सहाव्या मण्डळांतील पंचेचाळीसावें सूक्त बार्हस्पत्य शंयूचें आहे. त्यांतील ऋचा ३१[१०]–३२[११] व ३३[१२] मध्यें हजारांनीं दान करणाऱ्या 'बृबु' नांवाच्या पणीची स्तुति केली आहे. त्यांचा अर्थ असा : " गंगेच्या उन्नत तटाकाप्रमाणें 'बृबु' पणींच्या शिरोभागीं स्थित आहे. ६-४५-३१. " " वाऱ्याप्रमाणें शीघ्र गतीनें धावणारीं त्याचीं हजारांचीं दानें याचकाला ताबडतोब धन प्राप्त करून देतात. ६-४५-३२. " त्या " हजारांनीं द्रव्य मिळविणाऱ्या व हजारांनीं दान करणाऱ्या प्राज्ञ बृबूची आमच्यापैकीं सगळे आर्यकवि सर्वदा स्तुति करतात ६-४६-३३. " वरील तीन ऋचांवरून अत्यंत महत्त्वाची माहिती मिळते. बृबु नांवाचा श्रेष्ठ पणी व्यापारी हजारांनीं द्रव्य मिळविणारा ( सहस्रसातमम् ) आणि हजारांनीं दान करणारा होता ( सहस्र दातमम् ) होता. तो पणींत श्रेष्ठ होता. हजारांनीं दान करणाऱ्या श्रेष्ठ बृबूची "आमच्या पैकीं सर्व आर्य कवी ( नो विश्वे अर्य कारवः ) स्तुति करीत होते." ह्या ऋचांवरून अनेक महत्त्वाचीं अनुमानें निघतात. ह्या ऋचा निर्माण झाल्या त्यावेळीं कांहीं पणी कायम असून सुस्थितींत होते. त्यापैकीं ' बृबु ' हा श्रेष्ठ व्यापारी असून हजारांनीं द्रव्य मिळवीत होता व आर्यकवींना हजारांनीं दानें करीत होता. व्यापार करून हजारांनीं द्रव्य मिळविण्यास आणि श्रेष्ठ प्रकारचीं दानें करण्यास शांततेच्या काळाची आवश्यकता असते. मनुस्मृति अ. १०, श्लोक १०७[१३] मध्यें भारद्वाजानें बृबूचें दान घेतल्या-

---

८ समी पणेरजति भोजनं मुषे वि दाशुषे भजति सूनरं वसु ।
दुर्गे चन ध्रियते विश्व आ पुरु जनोयो अस्य तविषीमचुक्रुधत् ॥ ऋ. ५–३४--७

९ त्वां ही इन्द्रावसे विवाचो हवन्ते चर्षणयः शूरसातौ ।
त्वं विप्रेभिर्वि पणीरशायस्त्वोत इत्सनिता वाजमर्वा ॥ ( ६-३३-२ )

१० अधि बृबुः पणीनां वर्षिष्ठे मूर्धन्नस्थात् ।
उरुः कक्षो न गाङ्ग्यः ॥ ऋ. ६-४५-३१

११ यस्य वायोरिव द्रवद्भद्रा रातिः सहस्रिणी ।
सद्यो दानाय मंहते ॥ ऋ. ६-४५-३२

१२ तत्सु नो विश्वे अर्य आ सदा गृणन्ति कारवः ।
बृबुं सहस्रदातमं सूरिं सहस्रसातमम् ॥ ६-४५-३३

१३ भारद्वाजः क्षुधार्तस्तु सपुत्रो विजने वने ।
बह्वीर्गाः प्रतिजग्राह बृबोस्तक्ष्णोर्महायशाः ॥ ( मनु १०-१०७ )








बद्दल खालील उल्लेख आहे. "निर्जन अरण्यांत पुत्रासहित क्षुधेनें व्याकुळ झालेल्या महायश भारद्वाजानें बृबु सुताराकडून पुष्कळ गायींचें दान घेतलें." मनुस्मृतींतील वरील श्लोकांत असें सुचविलें आहे कीं, आपद्धर्म म्हणून भारद्वाजानें बृबुकडून पुष्कळ गायींचें दान घेतलें. परंतु वरील ऋचावरून असें दिसतें कीं, बार्हस्पत्य शंयूच नव्हे तर इतर सर्व आर्यकवी बृबुकडून मोठमोठीं दानें घेत असत. मनुस्मृतींतील श्लोकांत बृबूला सुतार (बृबोस्तक्षणोः) असें म्हटलें आहे. पणींना ऋग्वेदांत 'बृसयस्य शेषः' म्हणजे त्वष्टयाचें संतान असें म्हटलें आहे. त्वष्टयाचें वर्णन देवांचा सुतार असें केलें आहे म्हणून बृबु पणीचा उल्लेख 'तक्षा' ( सुतार ) असा केला आहे.

वरील विवेचनावरून हें दिसतें कीं, आर्यांचा पणींशीं संघर्ष दीर्घकाळ पावेतों ( सुमारें तीन शतकें ) चालला असावा. या अवधींत आर्यांनीं आपली सत्ता संपूर्णतः प्रस्थापित केली असावी. ह्या संघर्षांत बहुसंख्य पणींची कत्तल झाली असावी. त्यांच्यापैकीं कांहीं लोक दूर पळून जाऊन हिमालयाचे पायथ्याशीं मगधाचे उत्तरेस स्थायिक झाले असावे. जे पणी जीव धरून कायम राहिले त्यांनीं फिरून आपल्या बुद्धिमत्तेनें आणि कर्तबगारीनें आपलें वजन वाढविलें. आर्यांची सत्ता प्रस्थापित झाल्यानंतर त्यांनींहि पणींशीं मिळतें घेतलें असावें असें दिसतें. आर्य कवी पणींकडून दानांची अपेक्षा करीत व त्यांना त्यांचेकडून दानेंहि फार मोठ्या प्रमाणावर मिळत होतीं असें दिसतें.

**'बेकनाट' शब्दाचा अर्थ**

ऋचा ८-६६-१० मध्यें पणींना 'बेकनाटान्'[१४] असें म्हटलें आहे. त्यावरून कांहीं विद्वान् त्यांना 'बाबिलोनिअन' समजतात, कांहीं त्यांचा 'पारनिअन' आणि 'दाह' लोकांशीं संबंध जोडतात. हीं सर्व मतें ऋग्वेदाचा साकल्यानें विचार न करतां त्यांतील त्रोटक ऋचा व शब्द घेऊन व इराणमधील कांहीं भौगोलिक नांवाशीं साम्य पाहून प्रतिपादिलेलीं दिसतात. ऋग्वेदांत असें कांहींहि नाहीं कीं, ज्यामुळें ऋग्वेदांत संकलित केलेल्या ऋचा बाहेर देशांत रचल्या असें वाटावें. उलटपक्षीं आर्यांनीं भारतांत प्रवेश केल्यानंतर तेथील तटबंदीच्या शहरांच्या संस्कृतीचा नाश केला व आपली सत्ता प्रस्थापित केली हेंच सर्व मण्डळांतून व देवांच्या स्तुतींतून आलें आहे. भौगोलिक स्थळांच्या विशेषतः नद्यांच्या नांवांवरून व हिरियुपिया शहराच्या नांवावरून व पाक्थ ( पक्थुन ) शिव इत्यादि लोकांच्या नांवावरून पणींचीं तटबंदीचीं शहरें भारतांतीलच असून पणींचे आर्यांबरोबर झालेले संघर्ष भारतांतच झाले याबद्दल कोणत्याहि प्रकारचा संशय उरत नाहीं. 'बेकनाटान्' या शब्दावरून पणी बाबिलोनिअन होते असें अनुमान कांहीं विद्वानांनी काढलें आहे. 'बेकनाटान्' या शब्दाचा अर्थ सायणाचार्यानें दिला तो असा: "बेकनाटान्। अनेन कुसीदिनो वृद्धिजीविनो वार्धुषिका उच्यन्ते। कथं तद्व्युत्पत्तिः । बे इत्यपभ्रंशो द्विशब्दार्थे। एकं कार्षापणमृणिकाय प्रयच्छन् द्वौ मह्यं दातव्यं—नयेन दर्शयति ततो द्विशब्देनैकशब्देन च नाटयन्तीति बेकनाटाः । तान्।" सरळ भाषेंत सांगावयाचें म्हणजे 'बेकनाटः' या शब्दाचा अर्थ 'एक देतो पण दोन घेईन' असें अंगविक्षेप करून सांगणारा पणी सावकार असा आहे. सायणाचार्यांचा अर्थ अगदीं सरळ आणि व्युत्पत्तीस धरून आहे.

---

१४ The Panis have been variously identified with an aboriginal non-Aryan people, with Babylonians ( on the strength of the word Bekanātā ) with Parnians, the Dahae and other Iranian tribes. – ( Vedic age, page 249 ).












आणि तो ऋचेच्या संदर्भात जुळतो देखील. तो न स्वीकारून भलताच अर्थ काढण्याचें कांहींच प्रयोजन नाहीं. ' बेकनाटान् ' म्हणजे बाबिलोनिअन हा अर्थ ऋचेच्या संदर्भात जुळत देखील नाहीं. कांहीं विद्वान् पणींचा इराणमधील प्राचीन ' दाह ' लोकांशी संबंध जुळवितात. तसा कोणत्याहि प्रकारचा संबंध नाहीं हें वर दाखविलेंच आहे.

## ' अव्रत ' व ' अदेव ' म्हणजे काय ?

' अव्रत '–आर्यांच्या शत्रूंचा निदर्शक ' अव्रत ' शब्दहि ऋचांतून अनेक वेळा आला आहे. 'अव्रत' शब्दाचा अर्थ सायणाचार्यानें ' अव्रतान् व्रतरहितान् ' 'अव्रतं व्रतस्य यागादेः कर्मणो विरोधिनं ' असा दिला आहे. ऋचा १–१०१–२[15] मध्यें व्यंस, शम्बर आणि पिप्रु यांचें अव्रत म्हणजे यज्ञ न करणारे असें वर्णन आहे. त्या ऋचेचा अर्थ असा 'ज्यानें प्रवृद्ध झालेल्या क्रोधानें यज्ञयागादि न करणाऱ्या व्यंस, शम्बर आणि पिप्रु यांना ठार मारलें.' ' अव्रत ' शब्दाचा अर्थ मुख्यतः यज्ञयागादि न करणारे आर्यांचे शत्रू असा आहे व त्याच अर्थानें ' अव्रत ' शब्द ऋग्वेदांत सर्वत्र वापरला आहे. आर्यांचें विशेषण ' यजमानमार्य ' १–१३०–८ म्हणजे यज्ञ करणारे आर्य असें ऋचांतून आलें असून त्याचे विरुद्ध ' अव्रत ' हा शब्द यज्ञ न करणारे आर्यांचे शत्रू या अर्थी योजिला आहे. याच अर्थी ' अयज्यवः ' ७–८३–७ 'अयज्वनः' १–१०३–८ ' अयज्ञः ' १०–१३८–६ म्हणजे यज्ञ न करणारे आणि ' असुन्वतः ' १–१०१–४ म्हणजे सोम न गाळणारे असे आर्यांच्या शत्रूंचे निदर्शक शब्द ऋचांतून अनेक वेळा आले आहेत. वरील शब्दावरून आर्यांचे शत्रू यज्ञ न करणारे व सोम न गाळणारे म्हणजे आर्यांपेक्षा सर्वस्वी वेगळे होते. आर्य आणि दस्यू यांच्यांतील एकच आणि महत्त्वाचा फरक सांगावयाचा असल्यास आर्य यज्ञ करणारे होते आणि त्यांचे शत्रू दास यज्ञ करणारे नव्हते असाच सांगावा लागेल.

अदेवाः – आर्यांच्या शत्रूंना ऋचांतून 'अदेवाः' असें संबोधिलें आहे. अदेवाः म्हणजे ज्यांना देव नाहींत ते. आर्यांच्या शत्रूना देव नव्हते असें नाहीं, परंतु त्यांच्या देवांना आर्य देव मानण्यास तयार नव्हते. ते त्यांना ' अदेव ' म्हणजे ज्यांना देव नाहींत असे म्हणत. ' अदेव ' शब्दावरील सायणाचार्याचें भाष्य ( २–१९–७ ) ' अदेवस्य देवान् इन्द्रादीनजानतः ' असें आहे. आर्यांचे शत्रू आर्यांच्या इन्द्रादिदेवांना मानत नव्हते म्हणून आर्य त्यांना ' अदेव ' म्हणत असत असें दिसतें. वास्तविक आर्यांचे शत्रू मूर्तिपूजक असून, त्यांचे देवहि पुष्कळ होते. त्यांचा मुख्य देव ' बृसय ' अथवा ' त्वष्टा ' हा आहे. सायणाचार्यानें ' बृसय ' शब्दावर ' बृसय इति त्वष्टुर्नामधेयः ' बृसय म्हणजे त्वष्टा असें भाष्य दिलें आहे. त्वष्टयाचा मुलगा विश्वरूप नांवाचा तीन तोंडांचा, सहा डोळ्यांचा शिंगें धारण केलेला नग्न देव. हाहि आर्यांच्या शत्रूंचाच देव होता. विश्वरूपाचीं तीन तोंडें तीन ऋतूंचीं निदर्शक असून तो वन्यपशूंच्या मिथुनांचा जनक आहे असें ऋचांतून वर्णन आहे. आर्यांच्या शत्रूंचे देव नग्न असत. पूर्व आर्यांनीं आपल्या शत्रूंच्या देवाच्या कांहीं मूर्ती फोडल्या असाव्या असें दिसतें (१०-९९-६) आर्यपूर्व लोकांचे ' त्वष्टा ' आणि ' विश्वरूप ' हे दोन्ही देव आर्यांनीं आत्मसात करून घेतलें. त्या दोघांच्याहि वर्णनपर अनेक ऋचा आहेत. आर्यांच्या शत्रूंच्या धर्माचें आणि त्यांच्या देवांच्या स्वरूपाचें वर्णन येथें अप्रस्तुत आहे. आर्यांच्या यथावकाश पुढें तें कधींतरी देतां येईल.

---

[15] यो व्यंसं जाहृषाणेन मन्युना यः शम्बरं यो अहन्पिप्रुमव्रतम् ।
इन्द्रो यः शुष्णमशुषं न्यावृणङ्मरुत्वन्तं सख्याय हवामहे ॥ ऋ. १–१०१–२

शत्रूंना देव असून तें आर्यांच्या देवाहून सर्वस्वी वेगळे होते एवढें सांगितलें म्हणजे पुरे.

**' शिश्नदेव ', ' मूर ' व ' यातुधान '**

ऋचांतून आर्यांच्या शत्रूंना ' शिश्नदेवाः ' म्हणजे लिंगपूजक असें संबोधिलें आहे. त्यावरून ते लिंग-पूजक होते हें स्पष्ट आहे. त्यांचे देव नग्न होते यावरूनहि ते लिंगपूजक होते, हेंच सिद्ध होतें. हरप्पा उत्खननांतूनहि हीच गोष्ट सिद्ध झाली आहे. लिंगाच्या आकाराचे अनेक दगड उत्खननांत उपलब्ध झाले आहेत. हे तेथील लोकांचे देव असावे असा साधार तर्क आहे. ऋग्वेदावरून तसेंच हरप्पा उत्खननांतील पुराव्यावरून आर्यांचे शत्रू लिंगपूजक ( Phallic worshipness ) होते असें दिसून येतें. आर्यपूर्व लोकांच्या संस्कृतीची छाप नंतरच्या संमिश्र ( composit ) संस्कृतीवर फार मोठ्या प्रमाणावर पडली आहे. आर्यपूर्व लोकांच्या संस्कृतीचा बहुंशीं स्वीकार केला आहे त्यांत लिंग-पूजेचाहि स्वीकार फार मोठ्या प्रमाणावर केला असल्याचें आढळतें. त्याबद्दल जास्त विचार येथें प्रस्तुत नाहीं.

**मूराः**– ऋचांतून आर्यांच्या शत्रूंना ' मूराः ' ३–४३–६ आणि ' मूरासः ' ८–२१–१५ असेंहि संबोधिलें आहे. ' मूराः ' या शब्दाचा अर्थ सायणा-चार्यानें ' मूढाः ' असा दिला आहे. आर्य स्वतःला ' अमूराः ' म्हणजे मूढ नसलेले ( शहाणे ) म्हणत असून आपल्या शत्रूंना ' मूराः ' म्हणजे मूर्ख किंवा अडाणी म्हणत. दास आणि दस्यू ह्या शब्दा-प्रमाणें ' मूराः ' हा शब्ददेखील आर्यांच्या शत्रू-वाचक अनार्यदर्शक शब्द आहे. मौर्य वंशाचें नांव ' मुरा ' नांवाच्या स्त्री नांवावरून पडलें असा समज आहे. ही स्त्री मगधाच्या उत्तरेकडील अनार्य जातीची असावी. ' मुरा ' हे तिचें विशेष नाम नसून अनार्यदर्शक जातिवाचक नांव असावें.

**यातुधानाः**– याशिवाय आर्य आपल्या शत्रूंना ' यातवः ' ( ७–२१–१ ) ' यातुजू ' ( ४–४–५ ) यातुधानाः ( १–३५–१० ) या नांवानीं संबोधीत. ' यातुधानाः ' या सामासिक शब्दांत ' यातु ' आणि ' धानाः ' असे दोन शब्द आहेत. ' यातु ' म्हणजे जादू आणि ' धानाः ' म्हणजे प्रार्थना किंवा मंत्र. ' यातुधानाः ' या सामासिक शब्दाचा अर्थ जादू, ह्याच ज्यांच्या प्रार्थना किंवा मंत्र आहेत असे असा आहे. आर्य आपले शत्रू मायावी जादुगार आहेत असें समजत. त्यांच्या प्रार्थना जादू असून त्यामुळें त्यांना वाईट करण्याची फार मोठी शक्ती आहे असा त्यांचा समज होता. ' यातवः ' आणि 'यातुजू' या शब्दांतहि हाच अर्थ अभिप्रेत आहे. हिंदु-धर्मांतील शाक्त पंथांत तसेंच जैन आणि बुद्ध धर्मांत जी तंत्रविद्या ( Tantrism ) आहे तिचा उगम आर्यपूर्व लोकांच्या प्राचीन धर्मांत असण्याचा बराच संभव आहे. शाक्त पंथांत तर आर्यपूर्वांचे देव, त्यांची ' बली ' देण्याची पद्धति, लिंगपूजा आणि तंत्राच्या साहाय्यानें मिळणाऱ्या शक्तीची कल्पना या सर्व गोष्टींचें सम्यक् चित्र पहावयास मिळतें. आर्यांना आपल्या लिंगपूजक आणि तन्त्र-विद्या जाणणाऱ्या शत्रूंची किती भीति वाटत होती याची यथार्थ कल्पना यावी म्हणून ऋचा ७–२१–५[16] खालीं उद्धृत केली आहे. तिचा अर्थ असा " हे बलशाली इन्द्रा, जादुविद्या जाणणारे व ( आपल्या देवांना ) नमन करणारे ( आमचे शत्रू ) आपल्या विद्यांनीं आमची हिंसा न करोत. ( आमचा ) स्वामी इन्द्र ह्या क्षुद्र जंतूंना शिक्षा करण्यासाठीं उत्साहित होवो. हे लिंगपूजक आमच्या यज्ञावर मात न करोत ( ७–२१–५ ). " ह्या ऋचेवरून आर्यांचे शत्रू लिंगपूजक होते आणि त्यांच्या जादुविद्येला आर्य फार भीत होते असें दिसून येईल.

---

१६ न यातव इन्द्र जूजुवुर्नो न वन्दना शविष्ठ वेद्याभिः ।
स शर्धदर्यो विषुणस्य जन्तोर्मा शिश्नदेवा अपि गुर्ऋतं नः ॥ ७-२१-५










आणि तो ऋचेच्या संदर्भांत जुळतो देखील. तो न स्वीकारून भलताच अर्थ काढण्याचें कांहींच प्रयोजन नाहीं. ' बेकनाटान् ' म्हणजे बाबिलोनिअन हा अर्थ ऋचेच्या संदर्भांत जुळत देखील नाहीं. कांहीं विद्वान् पर्णीचा इराणमधील प्राचीन ' दाह ' लोकांशी संबंध जुळवितात. तसा कोणत्याहि प्रकारचा संबंध नाहीं हें वर दाखविलेंच आहे.

## ' अव्रत ' व ' अदेव ' म्हणजे काय ?

' अव्रत '–आर्यांच्या शत्रूंचा निदर्शक ' अव्रत ' शब्दहि ऋचांतून अनेक वेळा आला आहे. 'अव्रत' शब्दाचा अर्थ सायणाचार्यानें ' अव्रतान् व्रतरहितान् ' 'अव्रतं व्रतस्य यागादेः कर्मणो विरोधिनं ' असा दिला आहे. ऋचा १–१०१–२[१५] मध्यें व्यंस, शम्बर आणि पिप्रु यांचें अव्रत म्हणजे यज्ञ न करणारे असें वर्णन आहे. त्या ऋचेचा अर्थ असा 'ज्यानें प्रवृद्ध झालेल्या क्रोधानें यज्ञयागादि न करणाऱ्या व्यंस, शम्बर आणि पिप्रु यांना ठार मारलें.' ' अव्रत ' शब्दाचा अर्थ मुख्यतः यज्ञयागादि न करणारे आर्यांचे शत्रू असा आहे व त्याच अर्थानें ' अव्रत ' शब्द ऋग्वेदांत सर्वत्र वापरला आहे. आर्यांचें विशेषण ' यजमानमार्यं ' १–१३०–८ म्हणजे यज्ञ करणारे आर्य असें ऋचांतून आलें असून त्याचे विरुद्ध ' अव्रत ' हा शब्द यज्ञ न करणारे आर्यांचे शत्रू या अर्थी योजिला आहे. ह्याच अर्थी ' अयज्यवः ' ७–८३–७ 'अयज्वनः' १–१०३–८ ' अयज्ञः ' १०–१३८–६ म्हणजे यज्ञ न करणारे आणि ' असुन्वतः ' १–१०१–४ म्हणजे सोम न गाळणारे असे आर्यांच्या शत्रूंचे निदर्शक शब्द ऋचांतून अनेक वेळा आले आहेत. वरील शब्दावरून आर्यांचे शत्रू यज्ञ न करणारे व सोम न गाळणारे म्हणजे आर्यांपेक्षा सर्वस्वी वेगळे होते. आर्य आणि दस्यू यांच्यांतील एकच आणि महत्त्वाचा फरक सांगावयाचा असल्यास आर्य यज्ञ करणारे होते आणि त्यांचे शत्रू दास यज्ञ करणारे नव्हते असाच सांगावा लागेल.

अदेवाः – आर्यांच्या शत्रूंना ऋचांतून 'अदेवाः' असें संबोधिलें आहे. अदेवाः म्हणजे ज्यांना देव नाहींत ते. आर्यांच्या शत्रूना देव नव्हते असें नाहीं, परंतु त्यांच्या देवांना आर्य देव मानण्यास तयार नव्हते. ते त्यांना ' अदेव ' म्हणजे ज्यांना देव नाहींत असे म्हणत. ' अदेव ' शब्दावरील सायणाचार्यांचें भाष्य ( २–१९–७ ) ' अदेवस्य देवान् इन्द्रादीनजानतः ' असें आहे. आर्यांचे शत्रू आर्यांच्या इन्द्रादिदेवांना मानत नव्हते म्हणून आर्य त्यांना ' अदेव ' म्हणत असत असें दिसतें. वास्तविक आर्यांचे शत्रू मूर्तिपूजक असून, त्यांचे देवहि पुष्कळ होते. त्यांचा मुख्य देव ' बृसय ' अथवा ' त्वष्टा ' हा आहे. सायणाचार्यानें ' बृसय ' शब्दावर ' बृसय इति त्वष्टुर्नामधेयः ' बृसय म्हणजे त्वष्टा असें भाष्य दिलें आहे. त्वष्ट्याचा मुलगा विश्वरूप नांवाचा तीन तोंडांचा, सहा डोळ्यांचा शिंगें धारणे केलेला नग्न देव. हाहि आर्यांच्या शत्रूंचाच देव होता. विश्वरूपाचीं तीन तोंडें तीन ऋतूंचीं निदर्शक असून तो वन्यपशूंच्या मिथुनांचा जनक आहे असें ऋचांतून वर्णन आहे. आर्यांच्या शत्रूंचे देव नग्न असत. पूर्व आर्यांनीं आपल्या शत्रूंच्या देवाच्या कांहीं मूर्ती फोडल्या असाव्या असें दिसतें (१०-९९-६) आर्यपूर्व लोकांचे ' त्वष्टा ' आणि ' विश्वरूप ' हे दोन्ही देव आर्यांनीं आत्मसात करून घेतलें. त्या दोघांच्याहि वर्णनपर अनेक ऋचा आहेत. आर्यांच्या शत्रूंच्या धर्माचें आणि त्यांच्या देवांच्या स्वरूपाचें वर्णन येथें अप्रस्तुत आहे. यथावकाश पुढें तें कधींतरी देतां येईल. आर्यांच्या

१५ यो व्यंसं जाहृषाणेन मन्युना यः शम्बरं यो अहन्पिप्रुमव्रतम् ।
इन्द्रो यः शुष्णमशुषं न्यावृणङ्मरुत्वन्तं सख्याय हवामहे ॥ ऋ. १–१०१–२








शत्रूंना देव असून तें आर्यांच्या देवाहून सर्वस्वी वेगळे होते एवढें सांगितलें म्हणजे पुरे.

**' शिश्नदेव ', ' मूर ' व ' यातुधान '**

ऋचांतून आर्यांच्या शत्रूंना ' शिश्नदेवाः ' म्हणजे लिंगपूजक असें संबोधिलें आहे. त्यावरून ते लिंगपूजक होते हें स्पष्ट आहे. त्यांचे देव नग्न होते यावरूनहि ते लिंगपूजक होते, हेंच सिद्ध होतें. हरप्पा उत्खननांतूनहि हीच गोष्ट सिद्ध झाली आहे. लिंगाच्या आकाराचे अनेक दगड उत्खननांत उपलब्ध झाले आहेत. हे तेथील लोकांचे देव असावे असा साधार तर्क आहे. ऋग्वेदावरून तसेंच हरप्पा उत्खननांतील पुराव्यावरून आर्यांचे शत्रू लिंगपूजक ( Phallic worshipness ) होते असें दिसून येतें. आर्यपूर्व लोकांच्या संस्कृतीची छाप नंतरच्या संमिश्र ( composit ) संस्कृतीवर फार मोठ्या प्रमाणावर पडली आहे. आर्यपूर्व लोकांच्या संस्कृतीचा बव्हंशीं स्वीकार केला आहे त्यांत लिंगपूजेचाहि स्वीकार फार मोठ्या प्रमाणावर केला असल्याचें आढळतें. त्याबद्दल जास्त विचार येथें प्रस्तुत नाहीं.

**मूरा :**— ऋचांतून आर्यांच्या शत्रूंना ' मूराः ' ३–४३–६ आणि ' मूरासः ' ८–२१–१५ असेंहि संबोधिलें आहे. ' मूराः ' या शब्दाचा अर्थ सायणाचार्यानें ' मूढाः ' असा दिला आहे. आर्य स्वतःला ' अमूराः ' म्हणजे मूढ नसलेले ( शहाणे ) म्हणत असून आपल्या शत्रूंना ' मूराः ' म्हणजे मूर्ख किंवा अडाणी म्हणत. दास आणि दस्यू ह्या शब्दाप्रमाणें ' मूराः ' हा शब्ददेखील आर्यांच्या शत्रूवाचक अनार्यदर्शक शब्द आहे. मौर्य वंशाचें नांव ' मुरा ' नांवाच्या स्त्री नांवावरून पडलें असा समज आहे. ही स्त्री मगधाच्या उत्तरेकडील अनार्य जातीची असावी. ' मुरा ' हे तिचें विशेष नाम नसून अनार्यदर्शक जातिवाचक नांव असावें.

**यातुधानाः**— याशिवाय आर्य आपल्या शत्रूंना ' यातवः ' ( ७–२१–१ ) ' यातुजू ' ( ४–४–५ ) यातुधानाः ( १–३५–१० ) या नांवानीं संबोधीत. ' यातुधानाः ' या सामासिक शब्दांत ' यातु ' आणि ' धानाः ' असे दोन शब्द आहेत. ' यातु ' म्हणजे जादू आणि ' धानाः ' म्हणजे प्रार्थना किंवा मंत्र. ' यातुधानाः ' या सामासिक शब्दाचा अर्थ जादू, ह्याच ज्यांच्या प्रार्थना किंवा मंत्र आहेत असे असा आहे. आर्य आपले शत्रू मायावी जादुगार आहेत असें समजत. त्यांच्या प्रार्थना जादू असून त्यामुळें त्यांना वाईट करण्याची फार मोठी शक्ती आहे असा त्यांचा समज होता. ' यातवः ' आणि 'यातुजू' या शब्दांतहि हाच अर्थ अभिप्रेत आहे. हिंदुधर्मांतील शाक्त पंथांत तसेंच जैन आणि बुद्ध धर्मांत जी तंत्रविद्या ( Tantrism ) आहे तिचा उगम आर्यपूर्व लोकांच्या प्राचीन धर्मांत असण्याचा बराच संभव आहे. शाक्त पंथांत तर आर्यपूर्वांचे देव, त्यांची ' बली ' देण्याची पद्धति, लिंगपूजा आणि तंत्राच्या साहाय्यानें मिळणाऱ्या शक्तीची कल्पना या सर्व गोष्टींचें सम्यक् चित्र पहावयास मिळतें. आर्यांना आपल्या लिंगपूजक आणि तन्त्रविद्या जाणणाऱ्या शत्रूंची किती भीति वाटत होती याची यथार्थ कल्पना यावी म्हणून ऋचा ७–२१–५[१६] खालीं उद्धृत केली आहे. तिचा अर्थ असा " हे बलशाली इन्द्रा, जादुविद्या जाणणारे व ( आपल्या देवांना ) नमन करणारे ( आमचे शत्रू ) आपल्या विद्यांनीं आमची हिंसा न करोत. ( आमचा ) स्वामी इन्द्र ह्या क्षुद्र जंतूंना शिक्षा करण्यासाठीं उत्साहित होवो. हे लिंगपूजक आमच्या यज्ञावर मात न करोत ( ७–२१–५ ). " ह्या ऋचेवरून आर्यांचे शत्रू लिंगपूजक होते आणि त्यांच्या जादुविद्येला आर्य फार भीत होते असें दिसून येईल.

---

१६ न यातव इन्द्र जूजुवुर्नो न वन्दना शविष्ठ वेद्याभिः ।
स शर्धदर्यो विषुणस्य जन्तोर्मा शिश्नदेवा अपि गुर्ऋतं नः ।। ७-२१-५








## अनार्यांचीं जातिवाचक व स्थलवाचक नामें

येथवर आर्यांच्या शत्रूंच्या विशेषणात्मक (connotative) नांवांचा विचार केला. ऋग्वेदांत आर्यांच्या शत्रूंचीं कांहीं जातिवाचक आणि स्थलवाचक नांवें देखील आढळतात. परंतु तीं तितकीशीं महत्त्वाचीं नाहींत. कारण त्यांच्यापासून आर्यांच्या शत्रूबद्दल विशेष महत्त्वाची माहिती मिळत नाहीं. ऋग्वेदांतील ऐतिहासिक व्यक्तींत भारतवंशांतील सुदास हा प्रमुख होय. त्याचे कारकीर्दींत ऋग्वेदांतील सर्वांत मोठी ऐतिहासिक घटना 'दाशराज्ञ' युद्ध घडली. ययातीच्या मुलांच्या नांवानें प्रसिद्ध असलेल्या पांच आर्य जमाती व पक्थ, भलानस, अलिन, विषाणिन्, आणि शिव या पांच अनार्य जमातींनीं मिळून सुदासावर हल्ला केला. पक्थ हे हल्लींच्या पक्थुनिस्तानांतील लोक असून इतर चार जमाती त्याचे जवळील प्रदेशांतील म्हणजे भलानस काबुलिस्तानांतील, विषणिन् काफिरिस्तानच्या नैऋत्येकडील, अलिन पक्थुनिस्तानाजवळील प्रदेशांतील, आणि शिव हे सिंधु आणि वितस्ता म्हणजे झेलम या नद्यांच्या मधील प्रदेशांतील राहणाऱ्या होत्या असे विद्वानांचे तर्क आहेत. वरील नांवें संस्कृत असून वर्णनात्मक आहेत असें दिसतें. उदाहरणार्थ, भलानस म्हणजे सुरेख नाकें असलेले, विषाणिन् म्हणजे शिंगें धारण करणारे, शिव म्हणजे शिवाचे उपासक, पक्थ म्हणजे (बळी) शिजवणारे व अलिन म्हणजे ठेंगू. हीं त्यांचीं नांवें मुळांत स्थलवाचक अथवा वंशदर्शक नसून त्यांच्या वैशिष्ट्यावरून दिलेलीं दिसतात. यमुना नदीच्या तीरावर भेद नांवाचा राजा राज्य करीत होता. तृत्सूंनी त्याच्यावर स्वारी करून त्यास ठार मारलें त्यावेळीं भेदाचे अंकीत अज, शिग्रू आणि यक्षू यांनीं तृत्सूंचें स्वामित्व कबूल करून त्यांना घोड्यांचा कारभार दिला. कांहीं विद्वानांच्या मतें अज, शिग्रू आणि यक्षू हे अनार्य होते. परंतु तसें निश्चयात्मक सांगतां येत नाहीं. त्यांच्या नांवावरून कोणत्याहि प्रकारचा बोध होत नाहीं. सुदासानें विश्वामित्राच्या साहाय्यानें कीकटांवर विजय मिळविला. 'कीकट' अनार्य असून मगध देशांतील रहाणारे होते असें कांही विद्वानांचें मत आहे. कीकट अनार्य होते असें यास्काचेंहि मत आहे. 'कीकट' पणी होते हें ऋचा ३-५३-१४ वरूनहि आढळून येतें. वरील नांवावरून आर्यांच्या शत्रूबद्दल विशेष महत्त्वाची माहिती मिळत नाहीं हें दिसून येईल. ऋग्वेदांतील दर्शकनामापेक्षां (denotations) विशेषणात्मक नामेंच (Connotatives) जास्त महत्त्वाचीं आहेत. त्यांच्यावरून आर्यांच्या शत्रूंबद्दल बरीचशी कल्पना येते हें आपण वर पाहिलेंच आहे.

---

## तीन सूत्रें

आज मी तुमच्यासमोर सूत्ररूपांत विचार मांडला आहे. पहिला विचार **केंद्रीय स्वराज्य;** दुसरा विचार **विभाजित स्वराज्य;** आणि तिसरा विचार **राज्य-मुक्ति** अथवा रामराज्य. त्याला रामराज्य म्हणायचें कीं अराज्य म्हणायचें, ही प्रत्येकाच्या इच्छेची गोष्ट आहे. ईश्वर नाहीं, असेंहि तुम्ही म्हणूं शकतां आणि ईश्वर क्षीरसागरांत झोपलेला आहे, असेंहि म्हणूं शकतां. पण ईश्वर घामोघाम होऊन काम करीत आहे हें तुम्ही म्हणूं शकत नाहीं. ईश्वर नाहीं अथवा तो अकर्ता झाला आहे, असें बोलूं शकतां. ईश्वर कर्म करीत आहे आणि सर्वांवर आपली सत्ता चालवीत आहे, असें तुम्हांला म्हणतां येणार नाहीं. हें तत्त्वज्ञान, ही ब्रह्मविद्या, या देशांत आपल्याला आणावयाची आहे.

**—विनोबा**



अनुक्रमणिका








प्रा. सदाशिव आठवले

# त्रयो वेदस्य कर्तारः

[ चार्वाक दर्शनावरील तिसरा लेखांक. ह्यांत चार्वाकीय वेदटीकेचें स्वरूप सांगून त्याचा ऐतिहासिक अर्थ लावण्याचा यत्न केला आहे. – लेखक ]

## वेदोपनिषदांचें इतकें महत्त्व सांस्कृतिक अभिमानामुळें

एखादा चांगला शिकलेला, प्रौढ बुद्धीचा परंतु हिंदु संस्कृति व भारतीय तत्त्वज्ञान ह्याविषयीं कांहींहि ज्ञान किंवा पूर्वग्रह नसलेला असा कुठला तरी लांबचा उत्तर ध्रुवावरचा माणूस शोधून काढावा. त्याला वेद आणि उपनिषदें वाचायला द्यावींत. तीं वाचून तो काय म्हणेल ? कांहीं भाग समजला नाहीं असें म्हणेल. न समजणारं असं त्यांत लिहिलं गेलं आहे, त्यांतलं कांहीं अर्थपूर्ण असूनहि समजायला कठीण असतं, पण कांहीं अर्थशून्य असल्यामुळेंच कळत नाहीं. वेदोपनिषदांत दोन्हीं प्रकार थोडेथोडे आहेत. परंतु उरलेल्या भागाविषयीं उपरोक्त वाचक काय म्हणेल ? तो म्हणेल, वेदांतल्या बहुतेक ऋचा काव्यमय आहेत. कांहीं काव्य ओबडधोबड आहे, कांहीं रसाळ आहे. वरुण, मरुत, अग्नि उषा वगैरे देवत्वरूप दिलेल्या निसर्गशक्तींना आणि इंद्रादि कांहीं कल्पनानिर्मित देवतांना प्राचीन अवस्थेंतलीं साधीभोळीं, प्रामाणिक माणसें, " हे इंद्रा, हे वरुणा, ह्या आहुती घे आणि आम्हांला धन, धान्य, गाई, भूमि, स्त्रिया, संतति, दीर्घायुष्य दे " अशा प्रार्थना करीत आहेत. हें सरळ आहे. ह्यांत कुठें कांहीं चूक नाहीं, पाप वाटण्याचें कारण नाहीं. ह्या गोष्टी देवतांकडे मागाव्या कीं नाहीं व मागून मिळतील कीं नाहीं हे प्रश्न निराळे. परंतु प्राथमिक अवस्थेंतील मानवानें देवता मानणें, त्यांना देण्याचें सामर्थ्य आहे असें मानणें आणि त्यांना देण्याविषयीं गळ घालणें हें मानवी जीवनांत स्वाभाविक दिसतें. उपनिषदांचे बाबतींत मात्र आपला उत्तरध्रुवस्थ वाचक जरा बुचकळ्यांत पडेल. परंतु दुसऱ्या वाचनानें त्याच्या लक्षांत येईल कीं, थोड्याशा प्रगत अवस्थेंतले हे उपनिषत्कालीन मानव मानवसहज अशा कुतूहलानें " मी कोण ? कोठून आलों ? हें काय आहे ? " वगैरे प्रश्न विचारीत आहेत आणि त्या प्रश्नांचीं आपल्या कुवतीप्रमाणें एकमेकांना उत्तरें देत आहेत. तें कुतूहल, ती ज्ञानतृष्णा कौतुकास्पद आहे. पण एवढेंच कौतुकास्पद आहे म्हणून तो थांबेल.

आम्हीं भारतीय मात्र एवढ्यानें संतुष्ट होणार नाहीं. त्या वेदोपनिषदांत सर्व ज्ञान सांठविलेलें आहे, सर्व शास्त्रीय शोध लागलेले आहेत, मानवी जीवनासंबंधीचीं सर्व सत्यें सांगून झालेलीं आहेत, आतां नवीन सांगण्यासारखें कांहीं राहिलेलें नाहीं असा कांहीं आग्रह धरूं. ही वृत्ति आतां बदलली आहे. झपाट्यानें आणखी बदल होत आहेत. तथापि वेड्यावांकड्या मार्गांनीं श्रुतींचा आश्रय घेण्याचें खूळ अगदींच गेलें आहे असें नाहीं. आणि स्वराष्ट्र, स्वसंस्कृति ह्यांचा अभिमान ह्याखालीं तें खपूनहि जातें, किंबहुना तें आदरासहि पात्र होतें. तूर्त ह्या आधुनिकांना इथेंच सोडून आपण प्राचीन विचारवंतांकडे वळूं.

## दार्शनिक ग्रंथांतील वेदप्रामाण्य

भारताचें सांस्कृतिक जीवन जसजसें अधिक विकसित, अधिक समृद्ध होऊं लागलें तसतसें त्यांचे तात्त्विक विचार अधिक पद्धतशीरपणें मांडलेले, अधिक तर्कनिष्ठ झालेले असे दिसूं लागतात. दार्शनिक ग्रंथांतून हें स्पष्ट दिसतें. परंतु गंमत अशी कीं, भारताच्या वैचारिक इतिहासांतील बहुतेक दर्शनें आपण जें कांहीं सांगत आहो तें वेदोपनिषदांतलेंच आहे, तें वेदांना मान्य आहे म्हणून ( कधीं तर म्हणूनच ! ) सत्य आहे असें अट्टाहासानें सांगतांना आढळतात. पूर्वमीमांसक किंवा सांख्य ह्यांसारखे दर्शनकार कदाचित् ईश्वरहि मानणार नाहींत पण वेद मानतील. न्यायदर्शन हें वस्तुतः तर्कशास्त्र. प्रमाणविद्येचा सांगोपांग अभ्यास करण्यासाठीं नैयायिक सज्ज झालेले; परंतु त्यांनाहि वेदांविरुद्ध कांहीं








म्हणायचें नाहीं. कर्मकांडाविरुद्ध अक्षर उच्चारावयाचें नाहीं. उलट वेदवाक्य हें त्यांच्या मतें एक प्रमाणच ! विश्वस्वरूप आपल्या विशिष्ट स्वतंत्र पद्धतीनें समजून घ्यायला निघालेल्या वैशेषिकांना तरी श्रुतींचा आसरा शोधण्याची काय गरज आहे ? पण नाहीं वेद म्हटले म्हणजे तिथें वाद बंद. योगदर्शनाची, उत्तरमीमांसेची सुद्धां हीच अवस्था. असें कां ?

ह्याचा अर्थ असा लागतो : सांख्य, नैयायिक, वैशेषिक, वेदान्ती वगैरे हे सगळे जो सूक्ष्म, अतिसूक्ष्म विचार करीत होते तो विश्वोत्पत्ति, विश्वस्वरूप, जीवन-स्वरूप अशांसारख्या प्रश्नांसंबंधीं. ह्यांत माणसासंबंधीहि विचार व्हायचा. पण तो 'एकट्या' मानव व्यक्तीसंबंधीं, त्या 'एकट्याच्या' मोक्षासंबंधीं, कैवल्यानंद स्थिती-संबंधीं. समाजाचा एक घटक ह्या नात्यानें ह्या माणसा-संबंधीं उल्लेखनीय असा विचार कधींच झालेला दिसत नाहीं. मानवसमाज हा त्यांच्या अभ्यासाचा विषय कधींच नव्हता. पण सामाजिक जीवनासंबंधीं विचार जरी केला नाहीं तरी समाजांत कांहीं व्यवस्था प्रत्येका-लाच हवी असते. स्वास्थ्य पाहिजे असतें, तें कसें लाभेल ह्याचा गंभीरपणें विचार होवो किंवा न होवो; पण तें हवें ह्याविषयीं दुमत असण्याचें कारण नाहीं. प्राचीन वैदिक दर्शनकारांची सामाजिक जीवनासंबंधीं फारसा विचार करण्याची कुवत तरी नसावी किंवा इच्छा तरी नसावी. आपला विषय नव्हे म्हणून त्यांनीं हा भाग सोडूनच दिलेला दिसतो. पण ह्या दर्शनकारांना सुद्धां स्वास्थ्य हवेंच होतें, शांति, व्यवस्था पाहिजेच होती – निदान आपला विद्याव्यासंग निर्वेधपणें चालावा म्हणून तरी ! आणि हें स्वास्थ्य समाज-व्यवस्था चालत आली आहे तशी चालत राहिल्यानें मिळेल अशी त्यांची समजूत होती. ती तशी चालावी – वर्णाश्रम, जातिधर्म लोकांनीं मानून जागच्या जागीं रहावें, यज्ञकर्मादि करून इहलोकींचीं सुखें संपादावींत. परलोकींच्या सुखासाठीं पुण्याईचें भांडवल जमा करून ठेवावें म्हणजे झालें. आणि ह्यासाठीं वेदाधार आवश्यक होता. स्वास्थ्य पाहिजे. समाज चालतो आहे तसा चालल्यानें दर्शनकारांना स्वास्थ्य मिळत होतें. इतरांना, बहुजनांना मिळत होतें कीं नाहीं ह्याची चौकशी करण्याचें कारण त्यांना वाटलें नाहीं. समाजजीवनांत अधिक न्याय पाहिजे असें त्यांना कधीं वाटलें नाहीं. आणि म्हणून दर्शनकारांच्या प्रतिपाद्य विषयाशीं वेदांचा कांहीं संबंध जरी नसला तरी कुठें तरी आपलें वेदप्रामाण्य ते हळूंच नमूद करून ठेवीत. सांख्यांचा मुख्य विषय अजिबात निराळा. तो विशद करण्याची तऱ्हाहि निराळी. तरीहि वेदांचें स्वतः प्रामाण्य सुरक्षिततेच्या दृष्टीनें सांगून ठेवलें.[1] पशुहिंसा वगैरेंमुळें यज्ञकर्में थोडीशीं अशुद्ध होतील असें त्यांनीं सूचित केलें पण यज्ञापासून मिळणाऱ्या फळांविषयीं शंका प्रदर्शित केली नाहीं. म्हणजे तीं तीं फळें मिळविण्यासाठीं यज्ञकर्में लोकांनीं करण्यांत त्यांना कांहीं चूक वाटलें नाहीं.[2] योगसूत्रांच्या वाचस्पतीच्या टीकेंतहि हेंच दिसतें. वेदानुसारी मनुस्मृतींत जो धर्म सांगितला आहे तो पाळला म्हणजे कांहीं अडचण येऊं नये.[3] पूर्वमीमांसा तर सरळसरळ कर्मकांडवादच आहे. वेदांतानें मीमांसेचा कांहींसा समाचार घेतला पण त्यांनींहि वेद प्रमाण म्हटलेच; आणि यज्ञाच्या फळांविषयीं त्यांनाहि शंका नाहीं. शंकराचार्यसुद्धां ह्याला अपवाद नाहींत. ऋग्वेदाची थोरवी सांगतांना वर्णाश्रम धर्माचें मूळ म्हणून त्याचें महत्त्व त्यांना नमूद करून ठेवावेसें वाटतें.[4] ज्ञाननिष्ठ आचार्य थोडीशीं वळणें घेऊन कां होईना पण कर्मनिष्ठा आपल्याला चालूं शकते असें सांगायला विसरत नाहींत. आत्मज्ञानाला साहाय्यक म्हणून नित्य-कर्माला त्यांच्या मतें स्थान आहे.[5] आत्मज्ञानार्थ चित्त-शुद्धि पाहिजे आणि ती नित्यानुष्ठानानें होते.[6] तेव्हां

---

१ – सांख्यसूत्रें ५–५०–५१; कारिका ४, ५.

२ – सांख्यसूत्रें ५–४१ ते ४६; कारिका २ व त्यावरील टीकाभाष्यें.

३ पातञ्जल योगसूत्राणि ( यः कश्चित्कस्यचिद्धर्मो मनुना परिकीर्तितः ।
स सर्वोऽभिहितो वेदे सर्वज्ञानमयो हि सः ॥ मनु २।७ )– आनंदाश्रम १९०४ पृ. १०.१२

४ ब्रह्मसूत्रभाष्य १।१।३

५ गीताभाष्य १८।१०

६ बृहदारण्यकोपनिषद्भाष्य ४।४।२२

स्वतःचा प्रतिपाद्य विषय दुसराच कांहीं असला आणि जे सिद्धान्त काढावयाचे ते निराळेच कांहीं असले तरी जातां जातां कर्मकांड सांवरून धरण्याची ही हातोटी पहाण्यासारखी आहे. हें कर्मकांड कोणतें तर वेदोक्त ! चित्तशुद्धि व्हायला पाहिजे : ठीक आहे. ती ह्या अमुक अनुष्ठानांनींच होईल हें कशावरून ? उत्तर : वेदांनींच सांगितलें आहे म्हणून ! तस्मात् श्रुतिप्रामाण्य.

## रूढ सामाजिक रचनेचें प्रामाण्य व चक्रकापत्ति

नैयायिकांच्या ग्रंथांतून आहे ती सामाजिक रचना योग्य आहे आणि अन्य तऱ्हेनें विचार करणें धोक्याचें आहे असे विचार अधिक तपशीलवार मांडलेले आढळतात. उदयन म्हणतो– वेद माना. कां ? लोक ( महाजन ) मानतात म्हणून. महाजन किंवा लोक कोण ? भक्ष्यपेयाचा विधिनिषेध न मानणारे, तर्काभ्यासाधारें वेदवचनाविषयीं शंका घेणारे जे चार्वाकादि नास्तिक त्यांच्यापासून दूर राहून यज्ञयाग मानणारे[७] ! ( भक्ष्य-पेयाद्यद्वैतरागजीविकाकुतर्काभ्यासव्यग्रताभिसन्धिपाषण्ड-प्रतारणादिनिबन्धनान्या या प्रवृत्तिर्यागादौतद्वान्महाजन; तत्परिग्रहात् वेदप्रामाण्यमिति । ) बुद्धांचे धर्मग्रंथ – आगम – अप्रमाण कां हें सांगतांना जयंतहि अशीच विलक्षण विधानें करतो. बुद्धवचनें अप्रमाण कां ? तीं वेदबाह्य आहेत. आणि ही वेदबाह्यता इतर अनेक गोष्टींप्रमाणें बुद्धांच्या जातिधर्मोचित आचार न मानण्यांतहि दिसते; ही जयंताची तक्रार ह्या ठिकाणीं लक्षांत ठेवली पाहिजे[८]. एखाद्या वेदाला किंवा आप्तवाक्याला प्रमाणत्व कसं येतं असा प्रश्न जयंत उपस्थित करतो आणि बहुजनांच्या मान्यतेनें तें येतें असें पटणारें उत्तर देतांना दिसतो[९]. पण लगेच पुढें असें बजावतो कीं, महाजन म्हणजे कोण, कुठले, कसे दिसतात वगैरे विचाराल तर मी तें सांगत बसणार नाहीं. मी एवढेंच म्हणेन कीं, महाजन चातुर्वर्ण्य आणि चातुराश्रमरूप आहे. वर्णाश्रमधर्म मानतात ते महाजन. कसा आहे खासा 'न्याय' ! वेदप्रणीत चातुर्वर्ण्य वगैरे मानतात तेच महाजन. आणि महाजन मानतात म्हणूनच वेद प्रमाण !! [१०]जयंत निःसंकोचपणें असें चक्री विधान करतो.

ह्या सर्व उल्लेखावरून एवढें स्पष्ट व्हावें कीं, दर्शनकारांना स्वास्थ्य हवें होतें आणि वर्णाश्रमधर्म कोलमडला तर तें नाहींसें होईल अशी भीति त्यांना वाटत होती. दार्शनिक वाङ्मयाप्रमाणें त्या काळच्या ललित वाङ्मयांत सुद्धां अनेक ठिकाणीं ही भीति व्यक्त झालेली दिसते. भगवद्गीतेनें सुद्धां 'वर्णसंकर' होऊन अराजक माजेल कीं काय अशी धास्ती घेतलेली दिसते. ह्याचा अर्थच असा कीं, वर वर्णिलेल्या कुणाहि दर्शनकारानें सामाजिक व्यवस्थेचा मूलगामी विचार स्वतंत्र बुद्धीनें केलेला नव्हता; आणि आहे अशी समाजव्यवस्था नसणें म्हणजे समाजव्यवस्थाच नसणें असा त्यांनीं निष्कर्ष काढला.

## शब्दप्रामाण्य मानणारे पण वेदांचें अप्रामाण्य सांगणारे दर्शनकार

ज्या इतर दर्शनकारांनीं समाजव्यवस्थेचा स्वतंत्रपणें विचार केला त्यांना वेद मानण्याचें कारण वाटलें नाहीं. वेदांचें अप्रामाण्य त्यांनीं नाना तऱ्हांनीं प्रस्थापित केलें. अशी अवैदिक दर्शनें म्हणजे बौद्ध, जैन आणि चार्वाक हीं होत. ह्यांपैकीं प्रत्येक दर्शनाला स्वतःचा असा कांहीं-एक सामाजिक विचार होता. आपण सांगणार तें वेद-विरुद्ध आहे हें लक्षांत घेऊन वेदप्रामाण्याचें तत्त्वच त्यांनीं मुळांत धुडकावून लावलें. ह्या अवैदिक दर्शनकारांतहि जैन, बौद्धांचा एक गट होतो तर चार्वाकांचा दुसरा स्वतंत्र गट पडतो.

जैनांनीं आणि बौद्धांनीं यज्ञसंस्थेला विरोध केला. ब्राह्मणाच्या श्रेष्ठत्वाच्या कल्पनेला हादरा दिला. कर्मकांडापेक्षां सदाचरणानें समाजांत सुस्थिति निर्माण

---

७ कुसुमाञ्जलि ( हरिदासटीकेसहित ) पृ. २० ( कलकत्ता १९०९ )

८ – बुद्धशास्त्रे हि विस्पष्टा दृश्यते वेदबाह्यता ।
जातिधर्मोचिताचार परिहारावधारणात् ॥ न्यायमंजरी. २ पृ. २४२
( चौखंबा १९३६ )

९ – महाजनप्रसिद्ध्यनुग्रहे हि सुवचमाप्तोक्तत्वम् भवति न अन्यथा । – कित्ता. पृ. २४३

१० – ...... आकारस्तु तस्य कीदृशं, पाणिपादं कीदृशं, शिरोग्रीवं वा, कियती तस्य संख्येति पुरुषलक्षणानि गणयितुं न जानीमः ... चातुर्वर्ण्यचातुराश्रमरूपश्चैषः महाजनः ... । कित्ता – पृ. २४३



अनुक्रमणिका






होईल हेंहि त्यानीं जाणलें. परंतु जातिभेद, वर्णभेद नाहींसे करण्यांत ते तरी यशस्वी झाले का ? जैनधर्म आजतागायत भारतांत टिकून आहे. जाति, पोटजाति, स्पृश्यास्पृश्यता वगैरे सर्व ब्राह्मणधर्माच्या दोषांसह शिल्लक आहे. बौद्ध तर भारतांतून उठलेच. ह्याचीं कारणें अनेक आहेत. कांहीं आज आपण सांगूं शकूं, कांहीं सांगूं शकणार नाहीं. पण तो इतिहास येथें प्रस्तुत नाहीं. येथें पहावयाचें आहे तें हें कीं जैन बौद्धांनीं पूर्वापार चालत आलेली, पुरोहितवर्गाच्या वर्चस्वाखालची, जन्मजात विषमता मानणारी, समाजरचना हीच काय ती समाजरचना नव्हे, दुसऱ्या प्रकारची शक्य आहे हें दाखविलें असलें तरी सुद्धां त्यांना कोणती नवी समाजरचना अभिप्रेत होती हें पाहूं जातां एकामागून एक भ्रमाचे भोपळे फुटूं लागतात. निर्वाणासारखें अनाकलनीय ध्येय त्यांनीं व्यक्तीला दिलें. पुनर्जन्माच्या, स्वर्ग-नरकाच्या कल्पनेंतून त्याला बाहेर काढलें नाहीं. सामान्य माणसाला ऐहिक जीवन सुखी, समृद्ध करणारें असें ध्येय त्यांनीं दिलें नाहीं. साधीसुधीं माणसें ऐहिक जीवन जगत असतात, त्यांना सुग्रास हवा असतो, चांगलें वस्त्र हवें असतें, लैंगिक सुख हवें असतें. परंतु ह्या गोष्टींचा पाठपुरावा करण्यांत कांहींतरी चूक आहे असें त्यांना कुणा महात्म्यानें सांगितलें कीं ते गडबडतात. मग त्याच्या मदतीला धर्मवचनांचा सोईस्कर अर्थ लावून देणारे पुरोहित धावून येतात. जैनांच्या आणि बौद्धांच्या शिकवणींत असें गरीब माणसाला खजील करणारें पुष्कळच आहे. म्हणून ब्राह्मण गेला तरी त्याच्या जागीं मुनि किंवा भिक्षु येऊन बसतो. हे नवपुरोहित वेदप्रामाण्याप्रमाणेंच सर्वज्ञप्रामाण्य[११] किंवा धर्मज्ञ-प्रामाण्य[१२] अशीं तत्त्वें काढते झाले. जैनबौद्धांनीं वेदप्रामाण्य झिडकारलें तरी शब्दप्रामाण्य कायम ठेवलें. वेदांचा शब्द प्रमाण नाहीं, पण सर्वज्ञाचा आहे; तीर्थंकर देतात ती आणि तीच सम्यक्‌दृष्टि; तथागत बुद्ध धर्मज्ञ, त्यानें लोकहितार्थ प्रेरित होऊन उच्चारलेले शब्द खोटे, चुकीचे असणेंच शक्य नाहीं, अशा तऱ्हेच्या भूमिका घेऊन कुठें काय प्रगति झाली ? चांगलें वाईट ठरविण्याची कसोटी काय तर अमुक धर्मग्रंथांतलें किंवा अमुक महापुरुषाचें वचन. जैन-बौद्धहि ह्याच्यापुढें प्रगति करूं शकले नाहींत. ह्याचें कारण कुठल्याहि आधाराची जरूरी नाहीं अशा तऱ्हेची सामान्य माणसाला चटकन पटवून देतां येण्यासारखी सरळ जीवनदृष्टि त्यांचेकडे नव्हती हेंच होय.

## चार्वाकाची वेदटीका व ऐहिकाचा महिमा

चार्वाकांच्या वेदटीकेचें स्वरूप अगदीं वेगळें आहे. त्यांनीं वेद मानले नाहींत म्हणजे शब्दप्रामाण्य किंवा आप्तवाक्यच मानलें नाहीं. स्वतःच्या भूमिकेशीं ते अत्यंत प्रामाणिक होते. परस्परविरोधी, विसंगत असें ते कधींच बोलत नाहींत. आणि म्हणूनच त्यांची वेदनिंदा जरा विस्तारानें पहाणें उपयुक्त ठरेल. वेद नित्य, अपौरुषेय मानायला ते तयार नाहींत. वेदकर्तृत्व मानवी स्मृतीच्या पलीकडचें आहे म्हणून वेदांचें श्रेष्ठत्व मानणें त्यांना हास्यास्पद वाटतें. एखाद्या विहिरीचें किंवा धर्मशाळेचेंहि मूळ सांगतां येत नाहीं. प्रदेश उध्वस्त झाला, पुष्कळ काळ लोटला तर एखाद्या गोष्टीच्या कार्याचें नांव लोपलें जातें. पण केवळ कर्त्याचें नांव सांगतां येत नाहीं म्हणून कृति नित्य किंवा अपौरुषेय होते कीं काय ?[१३] दुसरें असें कीं, वेद मानवांनीं निर्मिले एवढ्यासाठींच केवळ म्हणून मुळीं आम्हीं त्यांना अप्रमाण म्हणणारच नाहीं; परंतु माणसाचे ठिकाणीं दोष असतात आणि ते त्याच्या कृतींतहि उतरतात. म्हणून वेद निर्दोष, बिनचूक, प्रमाण असणें शक्य नाहीं.[१४] शिवाय असें कीं, तुम्हीं वेदांचे शब्द मानतां पण त्या शब्दांच्या अर्थाविषयीं तुमची खात्री आहे कां ? कर्त्यानें ज्या अर्थी शब्द वापरले असतील त्याच अर्थानें ते तुम्ही

११ – सिद्धसेन दिवाकर वगैरेंचे जैनतर्कशास्त्रावरील ग्रंथ.
१२ – धर्मकीर्ति वगैरेंचे बौद्धतर्कशास्त्रांवरील ग्रंथ.
१३ – तत्त्वोपप्लवसिंह– जयराशिभट्ट – बडोदें १९४०. पृ. ११६
( * जयराशि हा निश्चितपणें चार्वाकपंथीच असें म्हणतां येणार नाहीं. परंतु चार्वाकांचे इतर अनेक ठिकाणीं उधृत केलेले मुद्दे जयराशीनें एकत्र दिले असल्यामुळें हा आधार घेतला आहे. )
१४ – कित्ता. पृ. ११७












घेतां कां[१५] ? वेदांत चुकीचीं विधानें आढळतात, परस्परविरोधी वचनें दिसतात, पुनरुक्ति दिसते – अशा दोषांनीं भरलेल्या वेदांना काय किंमत द्यायची आहे ? ह्या चार्वाकांच्या रास्त सवालांना मीमांसकांनीं दिलेलीं उत्तरें किती बालिश स्वरूपाचीं आहेत तें मुळांतच पहाण्यासारखें आहे.[१६] वेदांतील कांहीं भागाची अर्थशून्यता किंवा अर्थ लागण्याची अशक्यता चार्वाकांनीं दाखवून दिली. जर्फरी, तुर्फरी इत्यादि शब्दप्रयोगांचें स्पष्टीकरण करा असें आव्हान त्यांनीं ब्राह्मणांना दिलें. यज्ञांतील कांहीं गलिच्छ प्रकारांवर – यजमानपत्नीनें यज्ञीय अश्वाचें लिंग घ्यावयाचें वगैरे– त्यांनीं सडकून टीका केली. मांसाची चटक लागल्या-मुळेंच यज्ञ आणि तत्प्रीत्यर्थ पशुहत्या हे प्रकार होतात असें सांगून त्यांनीं ब्राह्मणांचें जिव्हालौल्य जाहीर केलें. यज्ञांत टाकलेली आहुति किंवा पशु स्वर्गाला जातो तर यजमानानें आपल्या तीर्थरूपांना अशा तऱ्हेनें स्वर्गांत कां पाठवूं नये ? श्राद्धांत दिलेलें अन्न परलोकींच्या पितरांना पोंचतें तर प्रवासाला बाहेर पडलेल्या माणसाला शिदोरी कशाला बांधून द्यायची ? घरीं श्राद्धच कां करू नये ? माडीवर बसलेल्या माणसाला अशाच तऱ्हेनें अन्न कां पोचवूं नये ? असले मिस्किल प्रश्न उपस्थित करून वेदोक्त कर्मकांड किती मूर्खपणाच्या, पोरकटपणाच्या कल्पनांवर उभें आहे हें त्यांनीं दाखवून दिलें आणि एकंदर असा आढावा घेऊन वेद हे लबाड, धूर्त, पाजी, मूर्ख अशा भिक्षुकांची निर्मिति आहे असा निर्णय दिला.[१७] ( ही सर्व टीका बुद्धि पौरुषहीन भिक्षुकांविरुद्ध आहे. त्यांच्या जीविकेचा आधार असा जो वेदांचा भाग– म्हणजे कर्म-कांडाचा भाग त्यालाच अनुलक्षून आहे. वेदांतील इतर निव्वळ काव्यमय असा जो भाग तो अर्थातच चार्वा-कांना इथें अभिप्रेत नाहीं. ) वरील कांहीं तपशीलांवरून एवढें लक्षात यावें कीं, चार्वाकांची वेदटीका स्पष्ट, मुद्देसूद आणि मार्मिक आहे.

चार्वाकांप्रमाणेंच बौद्ध-जैनांनींहि अशी टीका केली आहे. परंतु पुढें पुढें त्यांनाच सर्वज्ञत्व आणि धर्मज्ञत्व असले सिद्धान्त काढावे लागले. याचें कारण त्यांनीं व्यक्तींना केलेल्या मार्गदर्शनांत नैतिक आदेशांचा भाग समजण्यासारखा असला, तरी न समजण्यासारखा, न पटण्यासारखा, न पचण्यासारखा असा भाग कांहीं थोडाथोडका नव्हता. आणि मग अशा वेळीं ग्रंथ-प्रामाण्य किंवा आप्तप्रामाण्य मिळालें कीं, सुटल्यासारखें वाटतें. पूर्वजन्म, पुनर्जन्म, कर्मफल असल्या कल्पनांतून बाहेर निघून विशुद्ध ऐहिक दृष्टि देऊं न शकल्यामुळें आणि इह लोकींच्या सुखसंपन्न जीवनाचें चित्र स्वतः पाहून दुसऱ्याला दाखवूं न शकल्यामुळें सिद्धसेन दिवा-कर, धर्मकीर्ति वगैरे जैनबौद्ध तर्कशास्त्र पंडितांना शब्द-प्रामाण्याच्या कातळावर आपली डोकीं हापटून घ्यावीं लागलीं. परलोक, यज्ञयाग, आत्मक्लेश, मोक्ष, निर्वाण, तीर्थयात्रा, वर्णजातिभेद वगैरे जंजाळांतून बाहेर पडून माणसानें, शेती, व्यापार, सरकारी कामकाज वगैरे चांगले उद्योग करून सुखासमाधानानें रहावें, हाच मार्ग बहुजनांच्या हिताचा आहे ही भूमिका चार्वाकांनीं आणि फक्त चार्वाकांनींच घेतली.[१८] ह्या आदेशांत संदिग्धता नाहीं, मायावीपणा नाहीं, भांबावून टाकणारी शाब्दिक कसरत नाहीं, लोकांना फसविण्याचा, लुबा-डण्याचा हेतु नाहीं. त्यामुळें एखाद्या वेदाचें किंवा एखाद्या सर्वज्ञ, धर्मज्ञाचें नांव लोकांच्या तोंडावर मारून त्यांना गप्प बसविण्याचा प्रसंगच येत नाहीं.

प्राचीन भारताच्या वैचारिक इतिहासांत ब्राह्मण-दर्शनकारांना वेदप्रामाण्याखेरीज पाऊल पुढें टाकतां येत नसे. बौद्ध-जैन वेदांकडे पाठ फिरवून सर्वज्ञांच्या, धर्मज्ञांच्या तोंडांकडे बघत बसले, चार्वाकांना आपली तर्कशुद्ध भूमिका कधींच सोडावी लागली नाहीं, ह्याचें रहस्य त्यांच्या जीवनविषयक दृष्टिकोणांत सांपडेल.

---

१५ – कित्ता. पृ. ११४

१६ – जैमिनीय मीमांसासूत्रें २।४।८ ते ३२ व त्यांवरील भाष्यप्रवचनें

१७ – सर्वदर्शनसंग्रह– प्रकरण १ लें; सर्वसिद्धान्तसंग्रह– लोकायतिक प्रकरण; सर्वमतसंग्रह– लोकायतप्रकरण; नैषधचरित वगैरे ...

१८– सर्वसिद्धान्तसंग्रह; सर्वमतसंग्रह; सर्वदर्शनसंग्रह ("ऋणं कृत्वा घृतं पिबेत्" ह्या मथळ्याचा प्रस्तुत लेखकाचा नवभारतांत प्रसिद्ध झालेल्या लेखांत ह्या बाबतींतले सर्व तपशील व आधार दिले आहेत. )



अनुक्रमणिका








प्रा. व. म. परांजपे

# "हंगेरींतील उठाव"

[ गेल्या वर्षीच्या ऑक्टोबरमध्यें हंगेरींत झालेल्या उठावाच्या वार्तेनें सारें जग खडबडून जागें झालें. त्याच्या नंतर लगोलग, रशियन सैन्यानें आंत घुसून, निर्घृण हत्याकांड करून तो उठाव दाबून टाकण्याच्या केलेल्या प्रयत्नाची वार्ता कानावर आली. जगांतील बहुतेक सगळ्या स्वातंत्र्यप्रिय राष्ट्रांना तें एक आव्हानच होतें. त्यासंबंधींची खरी माहिती मिळविण्याचा लगेच प्रयत्न सुरू झाला, परंतु तें काम फार अवघड होतें कारण हंगेरी भोंवतालचा पोलादी पडदा फारच भक्कम झाला होता.

यावेळीं योगायोगानें, डेली मेलचा वार्ताहर नोएल बार्बर, आंत शिरण्याचा व्हिसा मिळवूं शकला. हंगेरींत प्रवेश करून घेतल्यानंतर, तेथील नऊ दिवसांच्या वास्तव्यांत त्याला जें जें दिसलें, त्या संबंधींचें निवेदन त्यानें आपल्या 'A Handful of Ashes' या ग्रंथांत केलें आहे. त्यांतील पहिल्या रात्रीच्या त्यानें केलेल्या वर्णनावरून प्रस्तुत लेख तयार केला आहे.

स्वतंत्र राष्ट्रांतील नागरिकांचा विश्वासहि बसणार नाहीं, अशा भयानक घटना, लेखकानें वर्णन केल्या आहेत. रशियन रणगाडे आंत घुसल्यानंतर त्यांच्याबरोबर सामान्य लोकांनीं घेतलेली झुंज जितकी रोमहर्षक आहे, तितकीच रशियन शिपायांनीं केलेल्या कल्लोळाची हकीगत कटुतम आहे. हंगेरियन शिपायांनीं सामान्य नागरिकांशीं केलेल्या सहकार्यामुळें त्यांच्याजवळ मशिनगन्स सारख्या आधुनिक शस्त्रांचा सांठा जमला होता. त्यामुळें होणाऱ्या प्रतिकाराच्या कठोर स्वरूपानें संतापून जाऊन, जालियनवाला बागेची आठवण करून देणाऱ्या, किंवा त्याहिपेक्षां जास्त क्रूर पद्धतींचा अवलंब रशियन सैन्यानें केला व बायका-मुलें यांची भयानक हत्या केली. त्या प्रसंगाचें प्रत्यक्ष वर्णन नोएल बार्बरनें केलें आहे तें वाचून अंगावर शहारे येतात. परंतु त्याचबरोबर या अमानुष क्रौर्याला शौर्यानें तोंड देत, आपल्यामधील गुप्त पोलिसांना पकडून त्यांना दहशत बसेल असें शासन करीत, परक्यापुढें मान तुकवायची नाहीं या निर्धारानें हंगेरींतील सामान्य माणसें, बायका व मुलें यांनीं केलेल्या या अभूतपूर्व संग्रामाचें वर्णन वांचून, या स्वातंत्र्यवीरांबद्दल आदर वाटणार नाहीं असा मनुष्य विरळा. डिकन्सनें आपल्या 'A Tale of two cities' मध्यें म्हटल्याप्रमाणें, या गोष्टी नुसत्या शक्य आहेत एवढेंच नाहीं, तर हरघडी या जगांत त्या घडत आहेत. नऊ दिवसांचा हा उज्वल स्वातंत्र्यसंग्राम, त्यांत दिसून येणारें लहान माणसांचें थोर शौर्य आणि जुलमी राजसत्तेचा कठोर प्रहार, यांच्या प्रत्यक्ष वर्णनामुळें या ग्रंथाचें मोल फार मोठें आहे.— लेखक. ]

मी सरहद्द ओलांडली तेव्हां दाट धुकें पडलें होतें. गुरुवारीं रात्रीं ९॥ ला निकेर्सडॉर्फ हें ऑस्ट्रिअन सरहद्दीवरचें शेवटचें खेडें सोडलें. तेथून हंगेरीच्या चौकीवर जाऊन माझ्या पासपोर्टवर शिक्का मारून घेतला आणि पुढें निघालों. दूरवर असलेल्या तोफांच्या दिशेनें गाडी वळवितांना आपण एकटे आहोंत ही जाणीव फार होत होती, आणि त्यामुळें मनांत धाकधुक वाटत होती. कसेंहि करून मध्यरात्रीपूर्वीं हंगेरीच्या राजधानींत पोहोचणें मला फार आवश्यक होतें. बुडापेस्टमध्यें अगदीं घनघोर लढाई

सुरू आहे आणि घटकोघटकीं तिची तीव्रता वाढत आहे, असें मला समजलें होतें. पण खरी घनचक्कर त्यांतल्या त्यांत 'पेस्ट' मध्यें होती आणि मी जात असलेला रस्ता तर प्रथम 'बुडा'ला जात होता. पण मला आशा होती कीं, बुडाला पोहोंचल्यावर तेथल्या सात पुलांपैकीं एखादा तरी मला मोकळा मिळेल आणि मी त्यावरून पलीकडे पेस्टला जाऊं शकेन.

तसें पाहिलें तर माझें काम अगदींच साधें आणि सरळ होतें. बुडापेस्टला जाऊन तेथल्या घडामोडींचें फोटोसहित चक्षुर्वैसत्यम् वर्णन 'डेली मेल'ला पाठवून द्यावयाचें. प्रत्यक्षांत तें इतकें सोपें नसणार याची मला जाणीव होती. पण तरीहि त्या पहिल्या रात्रीं मोटारींतून जात असतांना, माझ्या मनांतहि आलें नाहीं कीं, हें सर्व संपेपर्यंत, दोनदां रशियन गोळया माझ्या डोक्यांत शिरणार आहेत, आणि शेवटल्या दिवशीं जखमी स्थितींत तीस सोव्हिएट रणगाडे समोर उभे असतांना त्यांची नजर चुकवीत, खांचखळग्यांतून मला पळून जावें लागणार आहे.

## युद्ध नव्हे, हत्त्या

त्याच्या आधींहि बऱ्याच घडामोडी व्हावयाच्या होत्या. या पहिल्याच रात्रीं एक लहान मुलगा— माझ्या हातावर मी घेतला असतांना—प्राण सोडणार होता. त्यानंतरच्या दिवसांत क्रौर्य आणि अमानुषपणा यांचें असें भयानक दर्शन मला घडणार होतें कीं, कितीहि काळ लोटला तरी मला त्याचें विस्मरण पडणें शक्य नाहीं. माझ्या मनःपटलावरून ते देखावे पुसले जावे अशी मला किती तीव्र इच्छा आहे. ब्रेडसाठीं रांग लावून उभ्या असलेल्या वृद्ध जर्जर स्त्रियांवर मशिनगन्सचा फवारा मारलेला मला बघावा लागणार होता. रणगाड्यांना बांधून रस्त्यांतून फरफटत नेलेलीं माणसें, उध्वस्त झालेल्या चौकांत कुजत पडलेलीं प्रेतें, रस्त्यांतल्या दिव्याच्या उजेडांत ऑपरेशन करतांना एका रशियनानें पोटांत मारलेल्या गोळीनें जखमी होऊन हॉस्पिटलमध्यें माझ्या शेजारच्या खाटेवर मरणाची वाट पहाणारा तो डॉक्टर, माझा जीव वांचविणारी ती मुलगी, या देशांतून तिला बाहेर काढण्याचें मी दिलेलें वचन, तिचें दुर्दैवी मरण, —कधींहि न विसरतां येण्यासारखे हे प्रसंग आहेत !

रोज दिवसा आणि रात्रीं काय काय घडलें, कोण मृत्युमुखीं पडले, आणि त्यांना मृत्यू कशा तऱ्हेनें आला, याचा सर्व इतिहास मी आज सादर करणार आहे. माझे अनेक मित्र गमावले. —अगदीं साधीं सरळ माणसें होतीं तीं. तें युद्ध नव्हतेंच. राजरोस हत्त्या होती. शाळेंत जायचें ज्यांचें वय अशा मुलांचा उघड उघड खून केला जात होता. महात्मतेच्या स्फुल्लिंगानें पेट घेतलेल्या छोट्या माणसांनीं अनुल्लंघनीय अडचणींवर मात करण्यासाठीं पुकारलेला तो लढा होता. लखलखीत गणवेष परिधान केलेले सेनाधिकारी त्याचीं सूत्रें हालवीत नव्हते. उध्वस्त झालेल्या बुडापेस्टच्या रस्त्यावरून, रक्तानें माखलेलीं बँडेज बांधून फिरणारीं मुलें याच्या अग्रभागीं होतीं. हजारोंनीं तीं मृत्यूच्या जबड्यांत शिरत होतीं. पण त्यांच्या चेहऱ्यावरचें हास्य कधीं मावळलें नाहीं. इथें सेनाधिकाऱ्यांचीं खलबतें नव्हतीं, सैन्याचें सुसज्ज कार्यालय नव्हतें, लढाईच्या डावपेचांबद्दलचा विचारविनिमय नव्हता. शेतांत किंवा कारखान्यांत काम करणारे पुरुष आणि तरुण मुलें, आणि घरांत वा शाळेंत वावरणाऱ्या स्त्रिया आणि मुली, यांचा हा कारभार होता. त्यांतले बहुतेक

सर्वजण मृत्युमुखीं पडले असले, तरी त्यांच्याबद्दल मी लिहिणार आहे[१] '

ऑस्ट्रियन सरहद्दीवरचा तांबडे आणि पांढरे पट्टे असलेला अडसर उचलला गेला आणि रात्रीं ९॥ वाजतां मी पलीकडे पाऊल टाकलें. या दोन हद्दीमधला एक मैलाचा पट्टा म्हणजे दोन अगदीं भिन्न जगांना वेगळी करणारीच रेषा होती. एका बाजूला स्वातंत्र्य, प्रकाश, स्वच्छ रस्ते, चंडोल वृत्तीचे व्हायोलिन-वादक, तर दुसरीकडे अंधकार, मृत्यू, रक्त आणि मशिनगन्सचें भयानक संगीत !

### डोक्यावरून गेलेल्या गोळ्या

हंगेरियन हद्दीवरचा अडसर तांबडे, हिरवे आणि पांढरे पट्टे असलेला होता. आंतील चक्राच्या साहाय्यानें तो बाजूला केला आणि मी आंत शिरलों. अशा या रात्रीच्या वेळीं मला तेथें पाहून आश्चर्यचकित झालेल्या अधिकाऱ्यांनीं मला रात्र तेथेंच काढून सकाळीं दिवसां-उजेडी पुढें जाण्यास सांगितलें. त्यांचें म्हणणें न ऐकतां मी गाडी पुढें काढली. बरीचशीं रशियन टँक्स हंगेरींत आलीं आहेत एवढी माहिती मला तेथें समजली. पुढें पांच मिनिटांनीं मला तीन सैनिकांनीं हटकलें. पण ते सर्व हंगेरियन होते. माझा पासपोर्ट ते बघत असतांना, मला एक विचित्र गोष्ट जाणवली. पुढें बऱ्याच वेळां माझ्या नजरेस तें येणार होतें. त्यांच्या हंगेरियन गणवेषावर, शिरस्त्राणावर, नेहमी आढळणारा सोव्हिएट लाल तारा फाडून काढला होता. त्याच्या जागीं एक तांबडा, हिरवा व पांढरा पट्टा असलेली फित होती.

बुडापेस्टपासून ऐंशीं मैलावर असलेल्या 'जर' (Gyor) या गांवीं मी पोहोंचलों. अंधार असल्यानें तेथल्या पुलावरून मी सावकाश गाडी हाकीत होतों. इतक्यांत एकदम बंदुकीचा आवाज आला आणि मी ब्रेक लावले. माझ्या डोक्यावरूनच गोळ्या उडविल्या होत्या. पुढें दहा फुटांवर रशियन रणगाडे उभे होते. आंतले सैनिक सर्व रशियन होते. त्यांनीं माझ्या सामानाची अगदीं कसून पहाणी केली. तेथून पुढें जातों तो दोनशें यार्डावर तीस रणगाडे उभे होते. या खेपेस तपासणी करतांना मोटारींतली बैठकहि त्यांनीं बाजूला काढली. मी त्यांना सिगरेट्स देऊं केल्या. पण हे लोक खंबीर होते. त्यांनीं मला सरळ मागें फिरण्यास फर्मावलें.

गाडी मागें घेऊन मी बाजूच्या गल्लींत वळविली. मोटारच्या दिव्यांच्या प्रकाशांत रस्त्यांत घरांच्या दारांत कांहीं लोक उभे असलेले मला दिसले. ते सर्व हंगेरियन नागरिक होते. मोडक्या तोडक्या इंग्रजींत, 'रस्कि–फार वाईट' हें त्यांनीं मला ऐकविलें. मला बुडापेस्टला जायचें आहे म्हटल्यावर, त्यांतल्या कांहीं मुलांनीं, लहान लहान बोळांतून नेत नेत मला तेव्हांच मुख्य रस्त्यावर

१ जॉन मेसफिल्डनें त्याच्या 'Consecration' मध्यें वर्णन केलेल्या शब्दांतच मी माझ्या भावना व्यक्त करूं शकेन.

Not the be-medalled commander, beloved of the throne,
Riding cock-horse to parade when the bugles are blown,

Theirs be the music, the colour, the glory, the gold;
Mine be a handful of ashes, a mouthful of mould.

Of the maimed, of the halt and the blind in the rain and the cold –
Of these shall my songs be fashioned, my tale be told.

— Amen.










आणून सोडलें. यानंतरचा माझा प्रवास बराच निर्वेध झाला.

## बुडापेस्टमध्यें

बुडापेस्टच्या वेशीजवळ मी जाऊन पोहोंचलों, आणि प्रथमच मी तोफांचा आवाज ऐकला. ढगांच्या गडगडाटासारखा तो पुनः पुनः वातावरणांत घुमत होता. ७५ मि. मि. टँक्सच्या तोफांचा गंभीर भयानक ध्वनि, आणि जोडीला मशिनगन्सचा फटफट आवाज यांचें मिश्रण फार मेसूर वाटत होतें. यानंतर पांच तास सतत मी हा आवाज ऐकत होतों.

बुडाच्या ज्या रस्त्यावरून मी गाडी हांकत होतों, त्यांचेकडे बघून, तेथें चालू असलेल्या लढाईची सतत जाणीव होत होती. फुटलेलीं तावदानें, उन्मळून पडलेलीं झाडें, उपटून काढलेले विजेचे खांब, आणि जिकडे तिकडे मोडून तोडून पडलेल्या मोटारी यांनीं रस्ते भरून गेले होते. ट्रॅमच्या तारा कापून काढून त्यांच्या साहाय्यानें रस्त्यांत अडथळे उभे केले होते. त्या भेंडोळयांच्या जाळयांतून गाडी बाहेर काढणें फार मुष्कील होतें. जरा गाडी पुढें गेली आणि एकदम पुढचीं चाकें एका खड्ड्यांत घुसलीं. रस्त्यावरचे दगडच उपटून काढले होते. विश्वास बसणार नाहीं असें भयंकर रूप दिसत होतें त्या चौकाचें. कोंपऱ्यावरचें प्रसिद्ध कॅफे उध्वस्त झालें होतें. आणि त्याच्यापुढें हजारों मोडक्या खुर्च्यांचा ढीग रचला होता.

ज्या खड्ड्यांत माझी गाडी अडकली त्याच्यापुढेंच, साध्या पहारी, कुदळी यांच्या मदतीनें ट्रॅमचे रूळ उखडून वांकवून, रणगाडे अडवून ठेवणारे सांपळे केले होते. एका कोंपऱ्यांत जळालेल्या चार लॉऱ्या एकावर एक उभ्या करून त्यांच्या आडून लढण्यासाठीं एक कोट तयार केला होता. अनेक वर्षें उभीं असलेलीं बाजूचीं मोठीं झाडें उपटून रस्त्यावर आडवीं केलीं होतीं. खरें म्हणजे तो चौक असा राहिलाच नव्हता. अर्ध्या रस्त्याचे दगड, नुसत्या हातांनीं उखडून, त्यांचे ढीग बनविले होते.

गाडी सुरू करण्याचा मी प्रयत्न केला पण तें शक्य नव्हतें. गाडीचे दिवे लावले आणि त्या प्रकाशांत मी तसाच पुढें निघालों. माझ्या पुढेंच एक मोठा कोट उभा होता. त्याच्या मागून गोळीचा फट्ट असा आवाज झाला. आणि लगेच पुलावर उभ्या असलेल्या टँकमधून एक गोळा सुटून माझ्या गाडीच्या दिशेनें येऊन आदळला. मी पट्दिशीं दिवे मालविले आणि गाडीच्या खालीं लपून बसलों. आणखी तीन गोळे उडाले. आणि मागोमाग कोटाच्या मागून मशिनगन्सचा मारा सुरू झाला. या धामधुमींत मला फक्त माझ्या गाडीची काळजी वाटत होती. कारण गाडी मोडली तर परत जाऊन या सर्व घटनांचें निवेदन सरहद्दीपलीकडे पोहोंचविणें मला शक्य नव्हतें.

जवळजवळ दहा मिनिटें गोळीबार सुरू होता. आणि मग एकदम पाण्याचा नळ बंद करावा तसा तो थांबला, आणि एक प्रकारची भयानक शांतता पसरली. इतकी कीं मला छातीची धडधड ऐकूं येत होती. माझें डोकें मात्र आतां भयंकर दुखूं लागलें. गाडीच्या खालून मी डोकें बाहेर काढलें आणि सिगरेट पेटविली. पूल ओलांडणें तर शक्यच नव्हतें. टेलिफोन चालू असेल कां याचा मी विचार करूं लागलों.

## मला भेटलेली " इलोना "

सिगरेटचें थोटूक मी विझविलें, इतक्यांत त्या चौकांतून एक लहानशी दिसणारी कोणी व्यक्ति माझ्याकडे धांवत आली, आणि जमिनीवर माझ्या शेजारीं आडवी झाली. प्रथम मला तिनें अंगावर घातलेल्या मळकट हिरव्या रेनकोटाशिवाय कांहीं दिसलें नाहीं. मग फक्त त्या व्यक्तीचा आवाज ऐकूं आला.

ती एक मुलगी होती. खांद्यावर एक छोटी स्वयंचलित बंदुक तिनें अडकविली होती. मोडक्यातोडक्या जर्मनमध्यें, मी कोण म्हणून तिनें मला विचारलें. तितक्याच वाईट जर्मनमध्यें मी ब्रिटिश

असल्याचें तिला सांगितलें. जरा बऱ्याशा इंग्रजींत हळू आवाजांत तिनें माझ्याशीं बोलायला सुरुवात केली.

" कुठें जखम नाहीं ना झाली ? " तिनें पहिला प्रश्न केला.

" छे, छे, मी अगदीं ठीक आहे "

" तुमच्या गाडीच्या दिव्यांमुळें रस्कींनीं तुमच्यावर गोळीबार केला. असें दिव्यांवर गोळीबार करणें त्यांना फार आवडतें "

" तुम्ही सगळेजण सुरक्षित आहांत ना ? " त्यांच्या कोटाच्या बाजूला निर्देश करून मी विचारलें.

" हो, हो, सर्व ठीक आहे. रस्कि खूप प्रयत्न करतात. पण त्यांना कांहींच साधत नाहीं. तिकडेच जाऊं आपण. जास्त सुरक्षित आहे तेथें."

तिचा आवाज मी एकत होतों पण अजून तिचा चेहरा मला दिसला नव्हता. तिनें मला विचारलें,

" खूप लांबून आलांत कां तुम्ही ? "

" लंडनहून " मी उत्तरलों.

" येथें यायला फार वेळ लागला असेल, नाहीं ? " तिचीं कांहीं इंग्लिश वाक्यें कानाला चमत्कारिक लागत होतीं. पण तरीहि खूपच चांगलें इंग्लिश होतें तिचें.

" नाहीं, तसा कांहीं फार वेळ नाहीं. सकाळचें जेवण लंडनमध्यें घेऊन निघालों मी. "

पंधरावीस सेकंद ती गप्प बसली. आणि मग एकदम म्हणाली, " छे, कसें शक्य आहे ! लंडनमध्यें सकाळचें जेवण आणि लगेच रात्रीं इथें ! छे, छे, एका दिवसांत हें शक्यच नाहीं. हें असें तुम्ही बोलूं नका. त्यानें माझ्या मनाला फार वेदना होतात. "

गोळीबार केव्हां पुनः सुरू होतो त्याची वाट पहात आम्ही मोटारीखालीं सरकलों.

" वेडेपणा वाटेल, पण खरें सांगूं, मला माझ्या गाडीची फार भीति वाटत आहे. तिच्या-वाचून माझें फार अडेल. " मी तिला म्हटलें.

" तुम्ही काळजी करूं नका. " अगदीं पुस्त-कांतल्या इंग्लिश भाषेंत तिनें उत्तर दिलें. " आम्ही ती सुरक्षित ठेवूं. "

थोड्या वेळानें ती म्हणाली, " चला आतां. नाहींतर पुनः गोळीबार सुरू होईल. आपण पहि-ल्यांदा तुमची गाडी हलवूं. "

मी गाडींत चढलों आणि तिच्या आडोशाला वांकून ती उभी राहिली. दिवे लावणें तर शक्यच नव्हतें. टँक्सकरतां केलेले सांपळे, मोडक्या गाड्या आणि तारांची भेंडोळीं यांतून वाट काढीत मी कोटाच्या मागें एका लहानशा गल्लींत शिरलों. आणि मग ३-४ शें यार्डांवर जाऊन गाडी थांबविली.

त्या मुलीनें मला गाडी थांबविण्यास सांगितलें.

" मी ह्या इथें राहतें. आणि आमचेच लोक येथें रक्षक म्हणून उभे आहेत. " आम्ही थांबल्या-बरोबर ५–७ बंदुकधारी व्यक्ति एका जुन्या घरा-च्या दरवाज्यांतून पुढें आल्या.

" अरे, ही तर इलोना " एकजण उद्गारला.

आतांच प्रथम मी तिचें नांव ऐकत होतों. अजूनहि ती मला नीट दिसत नव्हती. पण पुढें रशियनांच्या हातून तिची हत्या होईपर्यंतच्या काळांत अनेकदां मी तिला बघितलें.

" हे रक्षक तुमच्या गाडीची काळजी घेतील. कांही चोरीला जाणार नाहीं. मला आतां माझ्या दोस्तांकडे गेलें पाहिजे. तुम्ही येताय् ?" मी कांही बोललों नाहीं. सकाळीं स्वच्छ असलेल्या पण आतां चिखलानें माखलेल्या आणि थोड्याच वेळांत रक्तानें माखल्या जाणाऱ्या माझ्या ओव्हरकोटच्या खिशांत एक व्हिस्कीची बाटली घातली, दुसऱ्या खिशांत सिगरेटचीं ५–६ पाकिटें कोंबलीं आणि चौकाकडे परतलों. त्या लहानशा रस्त्याच्या टोंकाला एक दिवा एकटाच जळत होता. त्याच्या प्रकाशांत आल्यावर मी एकदम थांबलों, माझा हात पुढें केला आणि तिला म्हटलें, " इतक्या शौर्यानें लढून, तूं






माझ्या मदतीला आलीस त्याबद्दल मी फार कृतज्ञ आहे." तिला मी माझें नांव सांगितलें, (नोएल बार्बर), आणि पहिल्यांदाच ती कशी आहे तें बघितलें.

"नोएल म्हणजे नाताळ. म्हणजे तुझा जन्म केव्हां झाला असेल तें कळलें मला. मी पॉला इलोना. माझी आई मला पॉला म्हणते. मला मात्र इलोना म्हटलेलेंच आवडतें."

तिनें आपला हात सोडवून घेतला आणि मला म्हणाली, "चला आंता आपण त्या कोटाकडे जाऊं".

**चौकांतील धुमश्चक्री**

रस्त्यावर सगळीकडे पसरलेल्या फुटक्या कांचांच्या तुकड्यांवरून आम्ही पुढें गेलों. चंद्र वर आला होता. समोरच त्यांचा तो कोट उभा होता. पलीकडे पुलाच्या खालीं ३-४ रणगाड्यांच्या आकृति दिसत होत्या.

आम्ही अजून कोटापाशीं पोंचलोंहि नव्हतों. त्यापासून २० ते ३० यार्ड मागें असतांनाच, एकदम कानठळ्या बसविणारा तोफेचा आवाज झाला. तो इतका मोठा होता कीं त्याच्या आवाजांत शहराच्या इतर भागांतील तोफांचे आवाज पार बुडून गेले. पुलावरून तोफांचा गडगडाट होत होता, आणि आमच्या शेजारींच मशिनगन्सचा थडथडाट चालूं होता. आम्ही जमिनीवर एकदम आडवे झालों, आणि हातांवर रांगत रांगत निवाऱ्याकडे धांव घेतली : स्वातंत्र्यवीर आणि जुलमी राजवट यांच्यामधील ही धुमश्चक्री पांच तास चालूं होती. ती थांबली आणि मग कामास आलेल्या वीरांना हालविण्यास आम्ही सुरुवात केली.

त्या कोटामागें नऊजण होते. इलोना आणि आणखी एक माणूस सोडून, बाकी सगळेंजण वीसांच्या आंतलेच होते. एक मुलगीहि होती त्यांच्यांत. तिच्या पायावर गुंडाळलेल्या बँडेजमधून रक्ताचा डाग पसरत होता.

चौकाच्या इतर बाजूंकडूनहि पुलाच्या मध्यावर गोळीबार केला जात होता. प्रथम तर असें वाटलें कीं हजारों स्वातंत्र्यसैनिक पुलावर रशियनांना रोखून धरीत आहेत, पण पन्नासपेक्षां कांहीं जास्त नसावेत ते.

आम्ही चौकाच्या मध्यभागीं होतों. आदल्याच दिवशीं, कसें कोण जाणें पण या स्वातंत्र्यवीरांनीं तीन सबंध रेल्वेचे डबेच ओढून आणून येथें उभे केले होते. नुसत्या हातांनी माणसें असलें कांहीं करूं शकतील याच्यावर माझा कधींच विश्वास बसला नसता. आठ चाकें आणि प्रत्येक बाजूस बारा खिडक्या असणारे हे अजस्त्र अगडबंब डबे, शेजारच्या रेल्वेच्या यार्डांतून, हजारों लोकांनीं केवळ आपल्या हातांनीं ढकलित या चौकांत आणून उभे केले होते. तिथें आणल्यावर ते उलटे फिरविले होते. चाकें वरती झालीं होतीं. उलटून टाकल्यावर सरळ होतां येत नसलेल्या भल्या मोठ्या किड्याप्रमाणें ते तेथेंच पहुडले होते. त्यांच्या त्या भक्कम पोलादी पत्र्यांच्यामागें दडल्यावर रशियन गोळीबारापासून व्यवस्थित रक्षण होऊं शकत होतें.

डावीकडला डबा पार चेंचला गेला होता. पलीकडेच एक जळून गेलेला रशियन रणगाडा पडला होता. आदल्या दिवशीं संध्याकाळीं बुडाच्या बाजूच्या पुलाच्या टोंकावर रशियनांनी हल्ला चढविला होता. आमच्या या योद्ध्यांनीं रांगत सरपटत जाऊन, मोलॉटॉव कॉकटेल्सचा उपयोग करून एक रणगाडा निकामी करून टाकला आणि आंतले शिपाई गारद केले. तीन रणगाडे पुलावरच थांबले. पण एक मात्र चौकांत घुसला आणि त्यांतून बेफाम गोळीबार सुरूं झाला. त्यानें सरळ आपला मोर्चा मधल्या कोटाकडे वळविला, पण शेंवटल्या डब्यावर चढून तो चेंचून टाकण्यास त्यानें सुरुवात केली तोंच रस्त्यांत लोंबणाऱ्या तारा त्याच्या पट्टयांत अडकल्या आणि त्याला पुढें हालतां येईना. कांहीं वेळ आंतून मशिनगन्सचा मारा सुरूं ठेवला गेला. पण खालच्या








बाजूस बंदुकांचें तोंड वळविणें शक्य नव्हतें. डब्यांच्यामागें स्वातंत्र्यसैनिक दडून राहिले होते. त्यांची कांहींहि हालचाल दिसत नव्हती. इतक्यांत पुलाच्या बाजूनें दहाबारा आकृति पुढें सरकूं लागल्या. रणगाड्याच्या मदतीस येणारे ते रशियन सैनिक होते. अजूनहि स्वातंत्र्यसैनिक स्तब्धच होते. सबंध चौक अगदी निर्मनुष्य असल्यासारखा वाटत होता. रशियन पुढें सरकत अगदीं जवळ ठेपल्याबरोबर मात्र त्यांना टिपून मारण्यांत आलें. एक तासानंतर हळूंच रणगाड्याचें वरचें झांकण उघडलें आणि एकदम आंत पेट्रोलची बाटली फेंकून दिली. रशियन धडपडत बाहेर येऊं लागल्याबरोबर गोळया घालून त्यांना मारण्यांत आलें. जळलेला तो रणगाडा अजूनहि डब्याला रेलून तसाच पडला होता.

### कोटामागील सैनिक

कोटामागच्या त्या नऊ सैनिकांतला एकजण इंग्लिश खरोखरीच छान बोलत होता. त्याचें वय अठ्ठावीस होतें. त्याचें नांव डेनिस. अर्थशास्त्रज्ञ होता तो. आमची लवकरच दोस्ती जमली. यानंतर तो नेहमींच माझ्याबरोबर असे. त्याची मदत नसती तर मी फारसें कांहींच करूं शकलो नसतों.

इतरांचें बोलणें मला कांहीं समजत नव्हतें. एक तर पंधराच वर्षांचा होता. त्याचें नांव जॅनॉस. आपल्या छातीवर त्यानें एक जुना बंदुकीच्या गोळयांचा पट्टा अडकविला होता. आणि त्याला त्याचा फार अभिमान होता.

डेनिस मला म्हणाला, "बहुतेक कुठल्यातरी रशियन अधिकाऱ्याकडून तो मिळविला आहे त्यानें."

जॅनॉस मोठ्या आनंदानें उद्गारला, "हो, हो. रस्की! रस्की!" "आमच्या या गटांतलें हें बाळ आहे", इलोना हंसत म्हणाली. "तीन दिवस तो लढत आहे. तुमची व्हिस्कि त्याला आवडलेली दिसते. या सगळयाला तो अजून फार लहान आहे, नाहीं?" पेस्टमध्यें खूप जोरांत गोळीबार सुरूं होता.

त्याला चिडविण्यासाठीं डेनिस म्हणाला, "आमच्यापैकीं घाबरणारा असा तोच एकटा आहे". डेनिस काय म्हणतो तें इलोनानें सांगितल्यावर, तो फार संतापला. "उगीच त्याला छळूं नकोस" इलोना डेनिसला म्हणाली.

त्याच्या केंसांवरून हात फिरवीत डेनिस म्हणाला, "त्याला माहीत आहे, आमचा त्याच्यावर किती जीव आहे तें. पण तरीहि काल मी बघितलें तें न्यारेंच होतें. तो सतत लढत आहे. पण काल संध्याकाळीं हा इतका वेळ घराबाहेर राहतो म्हणून त्याला ठोक देण्याकरितां त्याची आई येथें आली. आणि हा गरीब बिचारा जॅनॉस,—त्यानें चार रस्कींना ठार केलें आहे हं! — आईला इतका घाबरला कीं हातांतलें सगळें तसेंच टाकलेंन् आणि पार दडी मारून बसला. आई परत गेली अशी खात्री झाल्यावर बाहेर आला तो."

खरोखरीच तो फक्त पंधरा वर्षांचा होता. अतिशय कींव आली मला त्या दृश्याची. उद्यां शाळेची वेळ होईपर्यंत त्यानें खरें म्हणजे आतां झोंपून जावयाचें. वरच्या बाजूस वळलेलें त्याचें तें नाक मोठें मजेदार दिसे. केंस तर इतके अस्ताव्यस्त कीं कुठल्या कंगव्याला ते दाद देतील असें वाटावयाचें नाहीं. खरें म्हणजे कोणाचाच चेहरा नीट दिसत नव्हता. आणि त्यांत मनावर ताण इतका होता कीं, दिसूनहि तो नीट लक्षांत राहिला नसता. पण दोन ढगांच्या मध्यें चमकून जाणाऱ्या चंद्रबिंबाप्रमाणें तोफांच्या प्रकाशांत नजरेस पडलेला त्याचा तो चेहरा मात्र मी कधींच विसरूं शकणार नाहीं.

दुसरी मुलगीहि लहानच होती. तिला जखमा झाल्या होत्या. तिच्या चेहऱ्यावर हास्य नव्हतें. इतर मुलांबरोबर बंदुक सरसावून तीहि उभी होती. खूप घाबरलेली दिसत होती ती.

इलोना म्हणाली, "रशिया एवढा बलाढ्य असतांनाहि हंगेरी पराभव कां कबूल करीत नाहीं, तें










आतां तुम्हांला समजेल. जेव्हां शक्य होईल तेव्हां तुम्ही आम्हांला मदत कराल, याची आम्हांस जाणीव आहे. तोपर्यंत आम्ही लढत राहणार. "

पुनः एकदां तोफांचा गडगडाट झाला. प्रत्येक-जण आपापल्या जागेवर धांवत गेला. व्हिस्कि पितां-नाहि, कोणीच आपली बंदुक दूर ठेवली नव्हती. इलोना आणि मी मधल्या एका डब्यांत गेलों, पुलावर दिसणाऱ्यांवर ती गोळया झाडीत होती.

पलीकडल्या आमच्या एका कोटावर ३॥ वाजण्याच्या सुमारास, एका गोळयानें धडक घेतली. उंचच्या उंच ज्वाला उफाळली आणि सबंध चौक प्रकाशानें उजळला.

अतिशय दुःखद स्वरांत इलोना म्हणाली, "आमची मोलॉटॉव कॉकटेल्स जळत आहेत." तिचा चेहरा घामानें डबडबला होता. डोळयांत अश्रु होते. पण भीति नाहीं तर क्रोध होता.

जळत्या आगींतून लोक बाहेर पडूं लागतांच सोव्हिएट मशिनगन्सनीं भराभर गोळया झाडून त्यांना मारलें. एकहिजण वांचूं शकलें नाहीं. अगदीं एकजात सगळे–मुलीदेखील–मारले गेले.

शेजारच्या डब्यांत जॅनॉस आणि आणखी एक-जण होता. डेनिसकडून त्यानें मला एकच प्रश्न विचारला. " आणखी सिगारेट आहे कां ? " डब्याच्या एका बाजूनें तो बाहेर डोकावला आणि पुलाच्या बाजूला वळून जोरांत ओरडला, " रस्की माटा ( रशियनांनो परत जा ). "

**धैर्याचें दर्शन**

ही शांतता फार भेसूर वाटत होती. गोळयांच्या वर्षावाचा हा कांहीं माझा पहिलाच अनुभव नव्हता. पण बायकामुलें लढत असल्याचा मात्र हा पहिलाच अनुभव होता. मला सारखें वाटत होतें, एकेकाला थप्पड लगवावी आणि घरीं जाऊन झोपा आतां, म्हणून सांगावें. लंडनमधील बॉंबवर्षावहि भयंकर होता, पण तेथें कोणाचा इलाज नव्हता. तेथील नागरिकांना त्याला तोंड देणें भागच होतें आणि त्यांतली कोठलीच हत्या थांबविणें आपल्या हातांत नाहीं या विचारानें ते जास्ती शूर बनत होते.

येथें तसें नव्हतें. जरी या बायकामुलांनीं स्वतः होऊन मृत्यूशीं सामना करण्याचा निश्चय केला होता, तरी लंडनपेक्षां येथें वेगळें होतें. भावनेच्या आवेगांत ध्येयाविना दुसरा विचारच येऊं शकत नाहीं. अशा वेळीं तरुण माणसें जें कमाल धैर्य दाखवितात त्याचें खरेंखुरें दर्शन मला आतां प्रथम घडलें. त्या मुलाला भीति नव्हती. पण दोघीहि मुली घाबरल्या होत्या हें निःसंशय. पण त्याचबरोबर रशियनांबद्दलचा द्वेष इतका रक्तांत भिनला होता कीं, त्यामुळें मृत्यूचीहि त्यांना पर्वा वाटत नव्हती. मी तेथें केवळ योगायोगानें आलों होतों. पण ते मात्र ठरवून आले होते. नसते आले तरी चालण्या-सारखें होतें. पण एकदां लढाई सुरू झाल्यावर प्रत्येक रशियन मारतांना त्यांना जो आनंद होत होता, त्याला कारण मृत्यू बघण्याची आवड हें नसून, स्वातंत्र्याची आंस आणि जुलमी राजसत्तेचा शेवट करण्याची तीव्र इच्छा हें होय.

बुडापेस्टमधील जनतेच्या हालअपेष्टा बघत असतांना, आणि रशियन सत्तेकडून चेपले जात असतांना, या सर्व काळांत मला भेटलेली प्रत्येक व्यक्ती खखुषीनें आणि आनंदांत मृत्यूला मिठी मारण्यास तयार असलेली मला दिसली. येथें जुलमाचा रामराम नव्हता. पगारासाठीं सेनाधिकाऱ्यांच्या आज्ञा पाळून लढाई करणारे हे वीर नव्हते. ही सर्व जॅनॉससारखीं कोवळीं मुलें होतीं. या धामधुमींत भाग घेतांना त्यांच्यापुढें एकच ध्येय होतें, " रशियनांनो परत जा. " Ruskie Mata.

आम्ही डब्यांत होतों तितक्यांत एकामागून एक गोळे येऊन धडकले. उजव्या बाजूच्या डब्यावरच एक गोळा येऊन पडला. खूप उंच इमारत कोसळावी तसा आवाज झाला.



अनुक्रमणिका

इलोनाच्या सांगण्यावरून मी तिकडे गेलों. सबंध डबा एखाद्या राक्षसानें फाडून काढावा तसा उध्वस्त झाला होता. एक जण तेथेंच मरून पडला होता. त्याचें शीर साफ धडावेगळें झालें होतें. अंधारांत माझा हात त्याच्या गळ्याला लागला. एका विशिष्ट तालांत रक्ताचा फवारा उडत होता.

इतक्यांत एक किंकाळी ऐकली म्हणून मी जॅनॉसकडे धांव घेतली. लाकडाखालीं तो अर्धा पुरला गेला होता. पण तो अजून जिवंत होता. हलकेंच मी त्याला बाहेर ओढून काढलें.अजूनहि तो हंसायचा प्रयत्न करीत होता. परंतु त्याच्या शरीरावर मध्याला रक्ताचा एक वाढत जाणारा डाग माझ्या नजरेंतून सुटला नाहीं.

माझ्या हातांत मी त्याला घेतला, एक व्हिस्कीचा घोट दिला आणि तोंडांत सिगरेट पेटवून दिली. मी कांहींहि करूं शकत नव्हतों. भराभर त्याची प्राणज्योत विझत चालली होती. पण तरीहि त्यानें बंदुकीवरची पक्कड सोडली नव्हती आणि अजूनहि तो हंसण्याचा प्रयत्न करीत होता. कांहीं वेळानें खूप दुःखानें ग्लानी येऊन झोपावें तसें त्यानें डोळे मिटले. अजूनहि त्याच्या चेहऱ्यावर हास्य होतें. पण मृत्यूनें त्याच्यावर झडप घातली होती.

### मृत्यूच्या जबड्यांतील काव्यवाचन

उजाडल्यावर, एकामागून एक रणगाडे परत फिरले. चौकांत दुसऱ्या बाजूला १०-१२ प्रेतें पडलीं होतीं. पण रणगाडे परत फिरूं लागतांच, आमच्या या योद्धयांनीं विजयाची आरोळी ठोकली. तात्पुरती कां होईना पण लढाई थांबली होती.

एक एकजण बाहेर येऊं लागले. रक्तानें माखलेले, दमून गेलेले असे ते दिसत होते. परंतु तरीहि ते आनंदी दिसत होते. त्यांच्या खांद्यावर जर बंदुका नसत्या, चौकांत जर तो भयंकर ढिगारा पडलेला नसता, आणि मृत शरीरावर पाय पडूं नये म्हणून काळजी घेत चालतांना ते दिसले नसते, तर रात्र-पाळी संपवून घरी जाणारे कामगारच आहेत ते, असेंच कोणालाहि वाटलें असतें.

बराच वेळ आम्हांला झोंप आली नाहीं. आम्ही स्वस्थ बसून होतो. शेवटीं इलोना उठली आणि टेबलावरचें एक पुस्तक तिनें उचलून आणलें.

" तुम्हांला कविता वाचायला आवडतात ? " तिनें विचारलें. मी तिला म्हटलें, कीं माझ्या ओव्हरकोटाच्या आंतल्या खिशांत मी नेहमी जवळ बाळगतों तो काव्यसंग्रह आहे.

" या इथें माझ्याजवळ, 'हाऊसमन' नांवाच्या तुमच्या एका इंग्लिश कवीचा कवितासंग्रह आहे. पण माझे प्राध्यापक त्या कविता वाचतात त्यावेळीं त्या खऱ्याखुऱ्या इंग्लिश वाटत नाहींत मला. तुम्ही झोंपण्याच्या आधीं एक तरी कविता वाचून दाखवा म्हणजे ती कानाला कशी लागते हें मला प्रथम समजेल."

मी कोणत्या ओळी वाचणार होतों, तें ठरलेलेंच होतें. माझ्या या आवडत्या कवीच्या कविता मी चाळूं लागलों, आणि मग मला अतिशय आवडणारीं दोन कडवीं मी वाचून दाखविलीं.

Into my heart an air that kills
  From yon far country blows.
What are those blue remembered hills,
What spires, what farms are those?
That is the land of lost content,
  I see it shining plain,
The happy highways where I went
  And cannot come again.

पायांतले बूटसुद्धां काढले नाहींत आणि मला न कळतच मी बसल्या जागीं झोंपी गेलों.

हंगेरींतली माझी पहिली रात्र ही अशी संपली.








प्रा. गोवर्धन पारीख

# दक्षिण आफ्रिकेंतील विद्यापीठांना वंशविषमतेचें ग्रहण

गेल्या महिन्यांत संयुक्त राष्ट्रसंघटनेच्या राजकीय समितींत दक्षिण आफ्रिकेंतील वंशविषमतेच्या धोरणाविषयीं चर्चा होऊन तें धोरण चालूं ठेवल्याबद्दल तेथील सरकारचा प्रचंड बहुमतानें निषेध करण्यांत आला. या चर्चेंत गेल्या मार्च महिन्यांत दक्षिण आफ्रिकन पार्लमेंटमध्यें मांडण्यांत आलेल्या विद्यापीठविषयक विधेयकाचा उल्लेख झाला. येत्या वर्षाच्या आरंभापर्यंत या विधेयकास कायद्याचें स्वरूप प्राप्त होईल अशी अपेक्षा आहे. प्रस्तुत लेखांत या विधेयकाचा व त्यामागील सामाजिक व राजकीय पार्श्वभूमीचा थोडक्यांत विचार करावयाचा आहे.

## ऐतिहासिक पार्श्वभूमी

दक्षिण आफ्रिकेंतील वंशविषमतेच्या धोरणाकडे (Apartheid) गेल्या कांहीं वर्षांतच भारताचें लक्ष गेलें आहे असें नाहीं. या धोरणाचा मुकाबला करण्यांतच म. गांधींच्या राजकीय जीवनाला प्रारंभ झाला हें प्रसिद्ध आहे. वंशविषमतेसंबंधानें १९४८ सालापासून विशेष बोलबाला झाला असला तरी एका अर्थी हें धोरण अत्यंत जुनें आहे. १६५२ सालीं केपटाऊन येथें डचांनीं आपली पहिली वसाहत केली तेव्हांपासून गेल्या तीनशें वर्षांचा येथील वसाहतवादाचा इतिहास त्याच्या मुळाशीं आहे. या दीर्घकालीन ऐतिहासिक पार्श्वभूमीचा येथें विचार करणें शक्य नसलें तरी आजच्या घटना अर्थपूर्ण होण्याच्या दृष्टीनें कांहीं महत्त्वाच्या ऐतिहासिक घटकांचा थोडक्यांत उल्लेख करणें आवश्यक आहे. हे घटक म्हणजे मुख्यत्वेंकरून धार्मिक व आर्थिक होत.

आरंभीं वसाहत करण्यास आलेले युरोपीय-लोक धार्मिक विचारसरणीच्या पगड्याखालीं होते. सतराव्या शतकांतील युरोपमधील धार्मिक कल्पनांची-विशेषतः काल्व्हॅंप्रणित 'कर्मविपाक,' व कायमची उच्चनीचता या कल्पनांची— त्यांच्या मनावर विलक्षण पकड होती. वसाहतीची जसजशी वाढ होत गेली तसतसा वसाहतवाल्यांत नागरी व ग्रामीण असा भेद होत गेला. आणि ग्रामीण विभागांत शेती करणाऱ्या 'बोअर' शेतकऱ्यांच्या मनावर वरील कल्पनांचें वर्चस्व कायम राहिलें. आपण विशिष्ट धर्माचे असल्यामुळें कायमचे उच्च आहोंत, आपल्या गटाचें अबाधित्व कायम राखणें हें आपलें कर्तव्य आहे, 'स्वातंत्र्य', 'विश्वबंधुत्व' इत्यादि कल्पना या त्या गटाबाहेरील लोकांना लागूं करावयाच्या कल्पना नव्हेत; बांटु, बुशमेन इत्यादि आफ्रिकन लोकांवर वर्चस्व गाजविण्याचा आपणांस जन्मसिद्ध हक्कच आहे, ही त्यांच्याठिकाणीं आढळणारी मनोवृत्ति दक्षिण आफ्रिकेंतील अनेक युरोपीय माणसांत अजूनहि कायम आहे.

## आर्थिक विकास व तज्जन्य प्रश्न

एकोणिसाव्या शतकांत युरोपीय मनुष्य दक्षिण आफ्रिकेंत पुष्कळच आंतवर पोहोंचला. आणि नव्यानें हातीं आलेल्या जमिनींचा ताबा घेऊन आफ्रिकन मजुरांच्या साहाय्यानें त्यानें तिची मशागत करण्यास आरंभ केला. ऑरेंज व व्हाल नद्यांच्या उत्तरेकडील प्रदेशांत त्याचें अबाधित वर्चस्व प्रस्थापित झालें. एकोणिसाव्या शतकाच्या मध्याच्या सुमारास या एकाच देशांतील विविध भागांत वंशभेदासंबंधीं वेगवेगळें धोरण दृष्टोत्पत्तीस येऊं लागलें. तथापि तोंपर्यंत दक्षिणआफ्रिका हा कृषिप्रधान देशच होता. १८७० सालीं हिऱ्यांच्या व १८९६ सालीं



अनुक्रमणिका






सोन्याच्या खाणींचा शोध लागल्यानंतर मात्र ही परिस्थिति पूर्णतया बदलली. नवें औद्योगिक जीवन सुरू झालें; दळणवळणांच्या साधनांचा विकास झाला; नवीं शहरें अस्तित्वांत आलीं; आफ्रिकन मजुरांना मागणी वाढूं लागली; आणि मोलमजुरी मिळवण्यासाठीं आफ्रिकन जनतेचा खेड्यांतून शहरांकडे लोंढा वळला. या बदलत्या परिस्थितीनें दोन प्रमुख गोष्टी घडून आल्या. एक म्हणजे युरोपीय व आफ्रिकन यांचा आधुनिक, शहरीं जीवनांतील वाढता संपर्क व दुसरी म्हणजे श्वेतवर्णीयांत व युरोपीयांत दारिद्र्याचा उद्भव. औद्योगिक जीवनांतील श्रमाचीं व थोड्याबहुत कौशल्याचीं विविध कामें आफ्रिकन मनुष्य चटकन् करी तर, उलट असलीं कामें आपल्या दर्जाला शोभणारीं नव्हेत या समजुतीनें युरोपीय तिकडे तिरस्कारदृष्टीनेंच पाही. बदलत्या आर्थिक जीवनाशीं जुळतें घेण्यास असमर्थ ठरलेल्या युरोपीय शेतकऱ्यालाहि दारिद्र्याची झळ लागली. तशांतच लोकसंख्येंत त्याचें प्रमाण अगदींच कमी. आफ्रिकन सत्तर टक्के तर युरोपीय अवघे वीस टक्के. अधिक उन्नत संस्कृतीचा आरंभीं फायदा मिळालेल्या पण बदलत्या परिस्थितींतील जीवनकलहांत पराभूत होऊं लागलेल्या व अनुवंशिक श्रेष्ठतेच्या कल्पनेनें भारावलेल्या अल्पसंख्य युरोपीय माणसाची त्या परिस्थितींतील प्रतिक्रिया म्हणजे वंशविषमतेची ही कल्पना होय.

### वंशविषमतेचे पडसाद

ब्रिटिश राष्ट्रकुलांतील एक स्वतंत्र संयुक्त राज्य म्हणून दक्षिण आफ्रिकेचें राज्य १९१० सालीं अस्तित्वांत आलें; आणि त्याच्या धोरणांत वंशविषमतेच्या कल्पनेचे पडसाद उमटावयास १९११ सालापासूनच आरंभ झाला. विशिष्ट कौशल्याचीं कामें करण्याची आफ्रिकन लोकांना मनाई करणारा कायदा त्या वर्षीं पास करण्यांत आला. नंतर लगेच दुसऱ्या एका व्यापक स्वरूपाच्या कायद्यान्वयें कोणतीं कामें आफ्रिकन व कोणतीं युरोपीय माणसानें करावयाचीं हें निश्चित करण्यांत आलें. युरोपीय व युरोपीयेतर लोकांचीं कामें भिन्न. सामुदायिक प्रयत्नांनीं आपलें वेतन निश्चित करून घेण्याचा व संपाचा पहिल्यांना हक्क, दुसऱ्यांना नाहीं. सर्वच क्षेत्रें युरोपीय माणसाला खुलीं असल्यानें त्यानें युरोपीयेतर करीत असलेलें काम केल्यास एकाच प्रकारच्या कामासाठीं, सारखीच लायकी असतांना, युरोपीय-माणसाला वेतन मात्र जवळजवळ दीडपट वा त्याहूनहि अधिक ! आणि सर्व वरच्या दर्जाचीं व अधिक पगाराचीं कामें केवळ युरोपीयांसाठीं राखून ठेवलेलीं !

ही विषमता केवळ आर्थिक क्षेत्रापुरतीच मर्यादित नाहीं; सर्व सामाजिक व राजकीय क्षेत्रांतहि ती भरपूर प्रमाणांत आढळते. त्याबरोबरच सामाजिक जीवनाच्या इतर सर्व क्षेत्रांतहि हा अलगपणा प्रस्थापित करण्यांत आला आहे. शाळा निराळ्या ! सार्वजनिक इमारती व कचेऱ्यांचीं प्रवेशद्वारें वेगवेगळीं ! पोस्टांत 'काऊंटर्स' निरनिराळीं; आगगाडींत डबे निरनिराळे ! बसेस भिन्न ! ट्राम भिन्न !! तुरुंगदेखील भिन्न !!! सर्व ठिकाणीं अधिक सवलती युरोपीयांना ! अशा प्रकारें सर्व क्षेत्रांत युरोपीय व इतर लोक यांचा मुळींच संपर्क येणार नाहीं यासंबंधीं सर्व प्रकारची पूर्ण खबरदारी घेतली जाते. आणि आतां नुकत्याच झालेल्या कायद्यानुसार दोघांच्या राहण्याच्या वस्त्याहि अलग करण्यांत आल्या आहेत.

आर्थिक व सामाजिक क्षेत्रांतील ही विषमता राजकीय विषमतेवांचून चालूं राहणें अशक्यच आहे. कायदेमंडळाच्या दोन्ही सभागृहांत आफ्रिकन लोकांचें प्रतिनिधित्व युरोपीयांकरवींच केलें जातें. बहुंशीं सरकारनियुक्त सभासद असतात. त्या सर्वांची मिळून दोन्ही सभागृहांतील संख्या सात आहे. आणि त्यांच्याकडे केवळ आफ्रिकनच नव्हे तर सर्व युरोपीयेतर– यांत मलायन व भारतीय












यांची संख्या पुष्कळच मोठी आहे-लोकांचें प्रतिनिधित्व आहे.

## वंशविषमतेचे उद्देश

सुमारें दीड कोटी लोकसंख्येच्या या देशांत चार निरनिराळे प्रमुख गट आढळतात. सुमारें एक कोटी आफ्रिकन वा बांटु, तीस लक्ष युरोपीय, पंधरा लक्ष मलाया व अन्य देशांतून आलेले कृष्णवर्णीय, व पांच लक्ष आशियाई-यांच्यामधील बहुसंख्य भारतीय आहेत. असे हे चार गट होत. या गटांचा 'वंश' म्हणून उल्लेख करणें ही त्या शब्दाची सरळ विटंबनाच होय. केवळ शारीरिक वैशिष्ट्यांवरून त्यांच्यांत भेद करायचा म्हटल्यास श्वेतवर्णीय व इतर असा तो करावा लागेल. तथापि तसा भेद पूर्णपणें केला जात नाहीं. वंशविषमतेच्या दृष्टीनें बोलावयाचें झाल्यास उच्च स्थानावर श्वेतवर्णीय, त्यानंतर मलायन व भारतीय आणि सर्वांत नीच स्थानीं आफ्रिकन अशी तीन निरनिराळया श्रेणींची वा टप्प्यांची उतरंड त्यांत अभिप्रेत आहे, असें म्हणतां येईल.

या तीन गटांतील विषमतेचें काहीं वेळां वर वर सोज्वळ दिसणारें समर्थन केलें जातें. "या तीन गटांचें संख्याबळ, व सांस्कृतिक दृष्टीनें त्यांच्या भिन्न भिन्न पातळी ध्यानांत घेतल्यास सामाजिक व राजकीय जीवनाच्या दृष्टीनें व्यक्ति हा मूलभूत घटक म्हणून मान्य करण्याऐवजीं गटालाच तें स्थान देणें अधिक उचित ठरतें; तसें केल्यानेंच प्रत्येक गटाला आपापल्या सांस्कृतिक जीवनाचा विकास करतां येईल; आपापल्या मूल्यानुसार जीवन जगतां येईल. त्यांना एकाच पातळीवर आणूं पहाणें हें त्यांच्या खऱ्या-खुऱ्या स्वातंत्र्याला विघातक आहे, त्यांच्या सामाजिक व सांस्कृतिक जीवनाला त्या योगानें धक्का पोहोंचण्याचा संभव आहे; म्हणून 'विषमता' 'विषमता' म्हणून ओळखला जाणारा मार्ग हा परिणामीं सर्वांच्याच हिताचा आहे. या गटांच्या उचनीचतेवर तो आधारलेला नाहीं. त्यामुळें फक्त त्यांच्यांतील भिन्नत्व हेंच काय तें सूचित होतें. तें सूचित केल्यानें लोकशाहीला कसलाहि बाध येऊं शकत नाहीं. त्या धोरणाच्या योगानें विशिष्ट सामाजिक परिस्थितीची लोकशाही दखल घेते इतकेंच !" असें हें समर्थन थोडक्यांत सांगतां येईल.

परंतु या विचारांत भयंकर स्वरूपाचा सत्यापलाप दडलेला आहे. हें सहज वरवर पहाणाराच्याहि ध्यानांत आल्यावांचून रहाणार नाहीं. वर उल्लेख केलेल्या विषमतेच्या विविध प्रकारावरून उचनीचतेची कल्पना त्यांत अभिप्रेत आहे हें सहज दिसून येतें. व त्याबरोबरच बहुसंख्यांकाना कायमचें दडपून ठेवण्याचा हेतूहि त्यांत आहे; सर्व गटांना आपापल्या इच्छेनुसार विकास करण्याचें स्वातंत्र्य देण्याची कल्पना त्यांत कोठेंहि नाहीं, हीहि गोष्ट अगदीं सूर्यप्रकाशाइतकी स्पष्ट आहे.

ही वंशविषमता सर्वांगीण स्वरूपाची असून देशांतील बहुसंख्य प्रजेला कायमचें दडपून ठेवणें हा तिचा हेतू आहे. त्यांना देण्यांत आलेलें 'संरक्षितांचें स्थान' ही तिची राजकीय बाजू. तथापि आर्थिक विकासामुळें संपर्क व त्याबरोबरच संकर वाढूं लागल्यास आजची अवस्था फार काळ टिकूं शकणार नाहीं, या जाणीवेंतून सामाजिक विषमता येते; व ती देखील कायम रहावयाची असल्यास आर्थिक जीवनांतहि बहुसंख्य लोक खालच्या पातळीवरच राखणें अपरिहार्य होतें. अशा प्रकारें या तिन्ही परस्परावलंबी बाजू आहेत. कोणतीहि झोटिंगशाही ही कालांतरानें नष्ट होण्याच्या मार्गावर जाऊं नये असें वाटत असल्यास तिला हळूहळू सर्वंकष रूप देणें कसें अपरिहार्य होतें या सामान्य सिद्धान्ताच्या यथार्थतेचें १९१० सालानंतरचा दक्षिण आफ्रिकेचा इतिहास हें एक उत्तम उदाहरण म्हणून देतां येईल. सुरुवातीस उल्लेख केलेलें विद्यापीठविषयक विधेयक हा त्या इतिहासांतलाच एक महत्त्वाचा टप्पा होय.










## विधेयकाचें स्वरूप

दक्षिण आफ्रिकेंतील नऊ विद्यापीठांपैकीं केपटाऊन व जोहान्सबर्ग या अवघ्या दोनच विद्यापीठांत श्वेतवर्णीय व इतर सर्व यांना समान भूमिकेवरून प्रवेश दिला जातो. नाताळ विद्यापीठांच्या डर्बन शाखेंत सर्वांना प्रवेश मिळतो; पण श्वेतवर्णीयांपासून इतरांना सर्व बाबतींत पूर्णपणें अलग ठेवण्यांत येतें. ऱ्होडस् विद्यापीठांत कृष्णवर्णीयांना फक्त संशोधन कार्यापुरताच प्रवेश मिळतो. मात्र फोर्ट हेअरचें केवळ कृष्णवर्णीयांसाठीं चालविण्यांत येणारें कॉलेज हें ऱ्होडस् विद्यापीठाला जोडलेलें आहे. इतर सर्व विद्यापीठें हीं केवळ श्वेतवर्णीयांसाठींच खुलीं आहेत असें म्हणतां येईल. आणि एक म्हणजे "दक्षिण आफ्रिका विद्यापीठ" हें पत्रद्वाराच्या मार्गानें विद्यादानाचें कार्य करतें. सर्वच विद्यापीठांना भरपूर आर्थिक साहाय्य सरकार करीत असतें; तथापि "दक्षिण आफ्रिका विद्यापीठां"चा अपवाद वगळल्यास इतर कोणत्याहि विद्यापीठावर पूर्ण सरकारी नियंत्रण आढळत नाहीं.

१९४८ सालीं वंशविषमतेच्या धोरणाचा राजकीय पुरस्कार सुरू झाला; आणि १९५३ मध्यें "युरोपीयेतरांना उच्च शिक्षण देण्याविषयीं स्वतंत्र व्यवस्था करण्याची व्यवहार्यता व त्यासाठीं लागणारा आवश्यक खर्च" यासंबंधीं चौकशीं करण्यासाठीं एक कमिशन नेमण्यांत आलें. अशा प्रकारच्या व्यवस्थेच्या इष्टानिष्टतेसंबंधींचा अभिप्राय या कमिशनच्या चौकशीच्या कक्षेंत बसत नव्हता; तरीदेखील त्या संबंधीं कमिशननें आपलें मत सूचित केलें; व अशी व्यवस्था करण्याच्या प्रयत्नांतून विद्यापीठांची स्वायत्तता, शिक्षणक्षेत्राचें स्वातंत्र्य, आणि अभ्यासक्रमाव्यतिरिक्त इतर कार्यक्षेत्रें या सर्वांना धोका निर्माण होण्याची शक्यता त्यांनीं स्पष्ट केली. १९५५ सालीं फोर्ट हेअर कॉलेजांत झालेल्या विद्यार्थ्यांच्या दंगलीची चौकशी करणाऱ्या एका तज्ज्ञांच्या समितीनें देखील विद्यापीठांत तंग वातावरण होण्याचें एक महत्त्वाचें कारण म्हणजे श्वेतवर्णीय व इतर यांच्यांत केला जाणारा भेदभाव हेंच होय, असा स्पष्ट अभिप्राय दिला; तथापि या सर्व घटना व अभिप्रायाकडे पूर्ण दुर्लक्ष करून हें विधेयक पुढें मांडण्यांत आलें आहे.

सर्व कृष्णवर्णीय लोकांना स्वतंत्र शिक्षणसंस्थांतून शिक्षण मिळण्याची व्यवस्था करण्याचें धोरण या विधेयकाच्या मुळाशीं आहे. त्याच्या अनुषंगानें तूर्त फोर्ट हेअर कॉलेज व डरबनमधील वैद्यकीय कॉलेज यांच्यापुरताच त्यांचा प्रवेश मर्यादित करण्यांत यावयाचा असून केपटाऊन व जोहान्सबर्ग येथील विद्यापीठांना कृष्णवर्णीय विद्यार्थ्यांना प्रवेश देण्यास मनाई करण्यांत यावयाची आहे. आणि ऱ्होडस् व नाताळ विद्यापीठांशीं संलग्न असलेल्या वरील कृष्णवर्णीयांच्या शिक्षणसंस्था त्यांपासून अलग करण्यांत येऊन सरकारी नियंत्रणाखालीं आणल्या जाणार आहेत. अशा प्रकारें कृष्णवर्णीयांपुरतेंच बोलावयाचें झाल्यास त्यांच्या प्राथमिक व माध्यमिक शिक्षणावर आजवर चालणारी सरकारी हुकमत यापुढें उच्च शिक्षणावरहि पूर्णत्वानें प्रस्थापित केली जाणार आहे. या सरकारी हुकमतीचें स्वरूप थोडेसें स्पष्ट करणें उद्बोधक होईलसें वाटतें.

कृष्णवर्णीयांसाठीं राखून ठेवण्यांत आलेल्या संस्था तद्देशीयांच्या व्यवहारासाठीं नेमण्यांत येणाऱ्या मंत्र्याच्या पूर्ण नियंत्रणाखालीं रहाणार आहेत. उदा. फोर्ट हेअर कॉलेजबद्दल बोलावयाचें झाल्यास (१) कॉलेजच्या कौंसिलच्या सर्व सभासदांची नेमणूक करणें व कौंसिलचा अध्यक्ष नेमणें; (२) कॉलेजच्या प्रिन्सिपालची नेमणूक करणें व सिनेटचे सभासद नेमणें; (३) कॉलेजमधें शिक्षक, कारकून व इतर सर्व श्रेणीचे नोकर यांची संख्या निश्चित करणें; (४) व त्यांच्या नेमणुका करणें; (५) सर्व श्रेणीच्या नोकरांचें वेतन, अन्य सवलती











आणि नोकरीच्या शर्ती ठरविणें; (६) विविध शैक्षणिक विभागांच्या घटना व कार्यपद्धति यांचें नियंत्रण करणें आणि (७) अभ्यासक्रमाचें नियंत्रण करणें; या व अशा स्वरूपाच्या इतर बाबतींतली सर्व सत्ता मंत्र्यांकडे रहाणार असल्याचें विधेयकांत नमूद करण्यांत आलें आहे. अशाच प्रकारचे अत्यंत व्यापक अधिकार विद्यार्थ्यांच्या बाबतींतहि सरकारनें घेतले आहेत. कोणत्या विद्यार्थ्याला कोणत्या अभ्यासक्रमासाठीं प्रवेश द्यावयाचा, त्याच्या वर्तनाचे नियम कोणचे, त्याच्या निवासासाठीं योग्य स्थानें कोणतीं इत्यादि सर्व बाबी सरकारनेंच ठरवायच्या आहेत. निरनिराळ्या शिक्षणसंस्था, व निरनिराळ्या वंशाचे वा गटांचे विद्यार्थी वा शिक्षक यांच्यासाठीं निरनिराळे नियम करण्याची सरकारला मुभा देण्यांत येणार आहे. व शिक्षकांना कोणत्याहि सरकारी खात्यावर वा शैक्षणिक विभागावर वा धोरणावर टीका करण्याची पूर्ण मनाई करण्यांत येणार आहे.

अशाप्रकारें १९४८ पासून विशेष कटाक्षानें अवलंबिण्यांत आलेलें वंशविषमतेचें धोरण आतां लवकरच उच्च शिक्षणक्षेत्रांतहि शिरणार आहे. कृष्णवर्णीयांना आर्थिक जीवनांत विशिष्ट खालच्या दर्जाचींच कामें द्यावयाचीं व राजकीय जीवनांत त्यांना कायमचें दडपून ठेवायचें यासाठीं त्यांचें शिक्षणहि नियंत्रित करणें आवश्यक ठरतें. या दृष्टीनें प्रस्तुत विधेयकाच्या रूपानें दक्षिण आफ्रिकन सरकारनें वंशविषमतेच्या धोरणांतील एक महत्त्वाचें पुढचें पाऊल टाकलें आहे असेंच म्हटलें पाहिजे. कृष्णवर्णीयांच्या केवळ संस्थाच भिन्न रहातील असें नसून त्यांतील अभ्यासक्रमहि वेगळा रहाणार आहे. "ज्याचा त्याला कधींहि उपयोग होणार नाहीं असा गणितासारखा एखादा विषय बांटु मुलाला शिकवायचा कशाला ? ... असलें शिक्षण दिल्यानें आफ्रिकन मुलांच्या अपेक्षा मात्र वाढतात, आणि देशांतील प्राप्त परिस्थितींत त्या पुऱ्या होऊं शकत नाहींत. यामुळें देशांतील परिस्थिति व सरकारी धोरण हीं ध्यानांत घेऊनच कृष्णवर्णीयांच्या शिक्षणक्रमाचें स्वरूप निश्चित करणें हेंच अधिक शहाणपणाचें म्हटलें पाहिजे !" अशा अर्थाचे आफ्रिकन लोकांच्या प्रश्नासाठीं नेमण्यांत आलेल्या मंत्र्याचे उद्गार या दृष्टीनें अत्यंत सूचक व महत्त्वाचे म्हणून ध्यानांत घेतले पाहिजेत.

## निर्णयात्मक पाऊल

सामान्यत: वंशविषमता म्हटली कीं, केवळ सामाजिक क्षेत्रांतच ती असावी असा समज होतो; क्वचित् प्रसंगीं आर्थिक क्षेत्रांतील विषमताहि ध्यानांत येते; नाहीं असें नाहीं. तथापि संकर व आर्थिक स्पर्धा टाळण्यासाठीं या मार्गाचा अवलंब करण्यांत येत असावा अशी समजूत होते व हें सर्व एक विशिष्ट राष्ट्रीय धोरण म्हणून लोकशाहीच्या—निदान औपचारिक संसदीय लोकशाहीच्या — चौकटींत बसवलें जात असावें असा भ्रम निर्माण होतांना आढळतो; व त्यांतूनच आज ना उद्यां हें धोरण लोकशाही मार्गानें बदलण्याचा संभव आहे अशी आशाहि कांहींच्या मनांत डोकावते. दक्षिण आफ्रिका हें ब्रिटिश राष्ट्रकुलांतील एक राष्ट्र असल्यामुळें ही समजूत बळावण्यास मदत झाली आहे. "इतरांना नसला तरी युरोपीय लोकांना तरी तेथें मतदानाचा हक्क आहे; म्हणून त्या राजवटीस लोकशाही राजवट म्हणावयास हरकत नाहीं; तिचा आधार सार्वत्रिक मतदानाच्या हक्काऐवजीं मर्यादित प्रमाणांतील मतदान असेल; तथापि त्यामुळें राजवटीच्या स्वरूपाला विशेष बाध येत नाहीं" हा विचार व त्यांतील अनेक ढोबळ दोष येथें स्पष्ट करण्याची गरज नाहीं. लोकशाहीची तोंडओळख असणाऱ्या कोणाच्याहि ते चटकन् ध्यानांत येऊं शकतील. येथें फक्त एकच मुद्दा स्पष्ट करणें आवश्यक वाटतें; व तो म्हणजे हा कीं, विद्यापीठांविषयींचें हें विधेयक म्हणजे दक्षिण आफ्रिकेला हुकूमशाही राष्ट्र बनवि-








णारें निर्णयात्मक पाऊल होय. यापुढें या राष्ट्राची त्या दिशेनें अत्यंत झपाट्यानें अधोगती होत जाणें अपरिहार्य आहे.

## फॅसिझमचा उदय

भावी अधोगतीची अपरिहार्यता स्पष्ट होण्यासाठीं विधेयकाच्या मुळाशीं असलेल्या विचारांतील मूलभूत दोष ध्यानांत घेतला पाहिजे. विषमता 'स्थिर' पायावर उभारावयाची म्हणजे केवळ खालच्या श्रेणींतील लोकांचें वैचारिक जीवन नियंत्रित करून चालणार नाहीं; वरच्या श्रेणींतील लोकांचे बाबतींतहि तसें करणें अपरिहार्य होईल. वंशविषमतेच्या बाबतींत हीच अडचण निर्माण होण्याचा संभव आहे. ज्या युरोपीय संस्कृतीच्या उच्चतेच्या कल्पनेवर हें वंशविषमतेचें धोरण आधारलेलें आहे असें समजण्यांत येतें तिच्याशीं तरी तें कितपत सुसंगत आहे हा एक प्रश्नच आहे. किंबहुना तसें तें नाहीं असेंच म्हणणें अधिक सुसंगत होईल. तात्पर्य केवळ कृष्णवर्णीयांच्या विद्यापीठाचें वा शिक्षणक्रमाचें नियंत्रण करून हा प्रश्न मुळींच सुटण्यासारखा नाहीं. त्यासाठीं श्वेतवर्णीयांचा शिक्षणक्रम देखील नियंत्रित करावा लागेल. आणि सर्वच विद्यापीठांचें वा शिक्षणक्रमाचें तथाकथित 'राष्ट्रीय' धोरणाला अनुकूल अशा प्रकारें नियंत्रण करण्याची कल्पना पुढें आली म्हणजे वंशविषमतेच्या आड दडलेली हुकूमशाही स्पष्टपणें प्रकट झाली असें म्हणण्यास मुळींच प्रत्यवाय नाहीं. अशा प्रकारचें धोरण शिक्षणक्षेत्रापुरतेंच मर्यादित राहील असेंहि समजण्याचें कारण नाहीं. तें राजकीय, आर्थिक व सामाजिक क्षेत्रांतहि पसरणें अपरिहार्य आहे. म्हणून दक्षिण आफ्रिकेचीं पावलें फासिस्ट हुकूमशाहीच्या दिशेनें पडत आहेत असें जें म्हटलें जातें तें केवळ हितसंबंधीयांनीं लावलेलें "लेबल" नसून तेथील आजच्या धोरणाचेंच यथार्थ वर्णन आहे असें म्हणावें लागतें.

## पत्त्यांचा बंगला

हुकुमशाही राजवटीला कोणी तरी पत्त्याच्या बंगल्याची उपमा दिली आहे. तो किती काळ उभा राहील हें सांगणें कठीण, पण केव्हां कोसळेल हेंहि त्याबरोबरच सांगतां यावयाचें नाहीं. दक्षिण आफ्रिकेच्या बाबतींत हें विधान अनेक अर्थांनीं खरें वाटतें. तथापि दक्षिण आफ्रिकेच्या धोरणांत कोणताहि महत्त्वाचा बदल नजीकच्या भविष्यकाळांत घडून येईल अशी आशा बाळगण्यास फारसा आधार नाहीं असा अभिप्राय जाणकार लोकांनीं व्यक्त केला आहे. कारण तेथील परिस्थितीचा साकल्यानें विचार केल्यास परिस्थिति आहे अशीच कायम राखूं इच्छिणाऱ्या शक्तींचें सामर्थ्य बदल घडवून आणूं इच्छिणारांपेक्षां तेथें अधिक प्रभावी असल्याचें दिसून येतें.

आफ्रिकन माणसाचें जीवन प्रत्यहीं अधिकाधिक असह्य होत आहे हें खरें आहे. ठराविक वस्तीच्या बाहेर पडण्याचा त्याला हक्क नाहीं. तो बाहेर पडलाच तर मोकळेपणानें हिंडू शकत नाहीं; कोठेंहि जायचें, रेल्वेचें तिकीट काढायचें, शहरांत रहायचें, रात्रीं बाहेर पडायचें, कामधंदा पहायचा तरी त्याला 'पास' असल्यावांचून कांहींहि करतां येत नाहीं. आफ्रिकन जनतेचा असंतोष अशा परिस्थितींत वाढत जाणें अपरिहार्य आहे. आणि आफ्रिकन नॅशनल काँग्रेसच्या निशाणाखालीं ही जनता अधिकाधिक संघटितहि होत आहे. सरकारी धोरण हें आफ्रिकन प्रजेच्या भीतीवरच आधारलेलें आहे. आणि त्यामुळें ही परिस्थिति किती काळ चालूं राहील याविषयीं सर्वांनाच शंका आहे. तथापि हें सर्व जरी खरें असलें तरी तूर्त तरी तेथील सत्तारूढ पक्षाला कसलाहि प्रभावी विरोध होण्याची शक्यता दिसत नाहीं. आणि सत्ता टिकविण्यासाठीं डावपेंच खेळण्याचें वा कारस्थानें करण्याचें कौशल्य या पक्षाच्या ठिकाणीं आहे ही गोष्ट आतां स्पष्ट झाली आहे. श्वेतवर्णीयांत प्रभावी












विरोधक नाहींत व कृष्णवर्णीयांत प्रस्थापित सत्तेला आव्हान देण्याचें सामर्थ्य अजून निर्माण झालेलें नाहीं. विरोधकांना परकीय साहाय्य मिळण्याचा तूर्त तरी संभव नाहीं. यामुळे नजीकच्या भविष्यकाळांत एकादां महत्त्वाचा बदल घडून येईल अशी फारशी आशा नाहीं असेंच म्हणावें लागतें.

वंशविषमतेला आळा बसण्याची थोडीबहुत आशा शिक्षणाच्या प्रसारामुळें निर्माण होऊं शकली असती; परंतु ती नष्ट करण्याचा डाव सत्तारूढ राष्ट्रीय पक्षानें विद्यापीठासंबंधींच्या या विधेयकाच्या रूपानें टाकलां आहे. त्यांतील संभाव्य धोका उघड आहे. या विधेयकामुळें केवळ कृष्णवर्णीयांचाच नव्हे तर श्वेतवर्णीयांचा विरोधदेखील वाढीस लागण्याचा संभव आहे. त्याचप्रमाणें वंशविषमतेच्या योगानें वाढत्या औद्योगीकरणाचा ओघ थोपवून धरतां येईल कीं नाहीं हा एक प्रश्न आहे. आणि आर्थिक दृष्ट्या हें धोरण सर्वथैव सदोष व उधळपट्टीचें आहे हें अगदीं स्पष्ट आहे. आफ्रिकन माणूस जें काम करूं शकतो तेंच करण्यासाठीं युरोपियन माणसाला दीडपट पगार कशासाठीं द्यायचा ? आणि कामगारांची वाढती गरज मूठभर युरोपियन माणसें कशी पुरी करीत रहाणार ? आफ्रिकन मजूर अधिकाधिक संख्येनें कामावर घ्यायचे म्हटल्यास त्यांना पूर्णपणें अलग ठेवणें कितपत शक्य होईल ? तात्पर्य हें धोरण आज ना उद्या पराभूत होणें अपरिहार्य आहे. सर्व सुसंस्कृत जगाकरवीं त्याचा होत असलेला निषेध अशा पराभवालाच साहाय्य करीत आहे हें निर्विवाद होय. तथापि या पराभवासाठीं, एका जागतिक युद्धाचा अनुभव घेतल्यानंतर तरी, विशेष किंमत द्यावी लागूं नये अशी दक्षता बाळगणें जरूर आहे. आजच्या जगाच्या सुसंस्कृततेची ही एक कसोटीच आहे असें म्हटलें पाहिजे.

---

श्रीमती सत्यबाला तायल

# देशभक्ति, लोकशाही आणि राजकीय पक्ष

## उद्वेगजनक परिस्थिति

स्वातंत्र्य मिळाल्यापासून सुमारें दहा वर्षांहून अधिक काळ लोटला तरी देशांत उत्साहाचें वातावरण उत्पन्न होऊन तें वाढीस लागल्याचें दिसून येत नाहीं. देशभक्तीचें बाह्य चिन्ह आकर्षक रीतीनें नजरेसमोर यऊन त्यानें देशवासीयांचीं हृदयें उचंबळून येत आहेत. आणि त्यांना समाज-कार्य करण्यास प्रवृत्त करीत आहेत. त्यांच्यांतील सद्भावनांच्या प्रेरणा व्यक्ति, संस्था, कार्यक्रम व आंदोलनें ह्यांच्यातर्फे वर्षानुवर्ष विकास पावत आहेत; असें सुबुद्ध विचारवान नागरिक क्वचितच् म्हणूं शकतील. अखिल जगांत एवढी अवाढव्य लोकशाही हिंदुस्थानांतच फक्त विद्यमान आहे अशी ग्वाही आपण दिली; आणि परदेशी चिकित्सक निरीक्षकांनींहि ह्या लोकशाहीचें गुणवर्णन केलें आहे. देशव्यापी आंदोलनेंहि गेल्या दहा वर्षांत झालीं नाहींत असें नाहीं; आणि उदात्त व भव्य कार्यक्रमांचा अंगीकार करण्यांत आला नाहीं असेंहि म्हणण्याचें कांहींच कारण नाहीं. जनतेच्या जीवनमानांतहि अल्पशी कां होईना पण सुधारणा झाली आहे असें आंकडेशास्त्री सिद्ध करीत आहेत. हें सर्व खरें असलें तरी देशोद्धाराची कळकळ बाळगणाऱ्या नागरिकांस संतोष व समाधान वाटेल अशी परिस्थिति दृग्गोचर होऊं शकत नाहीं हें उद्वेगजनक परंतु यथार्थ विधान आहे.

स्वराज्यांतलें आपलें सरकार छातीवर हात ठेऊन असें निःशंकपणानें म्हणूं शकतें कीं, आम्ही देशाच्या उन्नतीसाठीं, देशवासी यांच्या सुखसोयींसाठीं, त्यांचें जीवनमान वाढविण्यासाठीं, कारखाने, नद्यांचे बंधारे, अन्नधान्यवृद्धि इत्यादि अनेक कार्यक्रम अमलांत आणले व आणीत आहोत. आणि राष्ट्र निःसंशय प्रगतीच्या मार्गावर वाटचाल करीत आहे. ह्या श्रेयाचे वाटेकरी बनण्यांत आपण आत्मप्रौढी बाळगतो असेंहि सरकारांस वाटण्याचें कांहीं कारण नाहीं. परंतु आपण होऊन अंतःस्फूर्तीनें हें श्रेय सरकारला देण्याचें सार्वत्रिक वातावरण दिसून येत नाहीं असें कबूल करणें भाग आहे. कारण कृतज्ञताबुद्धि दाखविणारें हें श्रेय देण्यासाठीं ज्या भावनांची आवश्यकता आहे, जो आशावाद सर्वत्र पसरलेला पाहिजे, ज्या ऐक्याची, एकतानतेची व सुसंवादित्वाची जाणीव सगळीकडे प्रत्ययास यावयास पाहिजे, तशी आढळून येत नाहीं.

## असमाधानाची मीमांसा

एका अर्थी हें असमाधान असंतोष आणि उद्वेग खऱ्या वस्तुस्थितीचा निदर्शक नसून असमंजस विचारसरणीचा तो परिपाक आहे, विधायक कार्य करण्याची संवय व शिस्त गेल्या पन्नास वर्षांत लागलेली नसल्यामुळें हा असमाधानाचा मानसिक रोग जडलेला आहे, जनतेच्या अंगवळणी, विध्वंसक व द्वेषमूलक विचारप्रवाह पडल्यामुळें स्वराज्यप्राप्तीचें वाढून आलेलें मोठें सुदैव तीस उत्साहभरीत करूं शकत नाहीं; परकीय राज्यकर्त्यां-विरुद्ध अनेक वर्षें आंदोलनें व चळवळी सारख्या करीत गेल्यामुळें बहुसंख्य मतानें निवडून आणलेल्या स्वकीय राज्यकर्त्यांविरुद्धदेखील त्याच भावना आपमतलबी पक्ष जाणूनबुजून प्रकट करीत आहेत. मध्यमवर्गीय लोकांची मनोमालिन्यांत व विकारी भावनांत वाढलेली पिढी वयपरत्वें आपोआप नाहीशी झाल्याशिवाय समाजाचें योग्य मूल्यमापन होऊं शकणार नाहीं; स्वराज्यांत प्रतिष्ठा मिळविलेल्या व्यक्तींबद्दल व अंमलदारांबद्दल, अप्रीति व अविश्वास फैलावण्याऐवजीं, राज्यनिष्ठा, स्वराज्याबद्दल आदर व भक्ति नवीन तरुण पिढीमध्यें हरप्रयत्नानें वृद्धिंगत केल्याशिवाय आपल्या राष्ट्रास वैभवकाळ प्राप्त होणें कठीण आहे. तात्पर्य सर्व प्रकारची परिस्थिति लक्षांत घेऊन, जी उन्नति, प्रगति व मार्ग-आक्रमण, स्वराज्य सरकारातर्फे करण्यांत यत आहे ती आपल्या अडचणी, जागतिक वातावरण, आपलीं साधनें व तयारी लक्षांत घेतां, क्रमप्राप्त,



अनुक्रमणिका






सुयोग्य व नैसर्गिक आहे, आपल्या देशाच्या विकासाबद्दल उतावीळपणा दाखविण्याऐवजीं धीमेपणानें त्याच्या प्रगतीची गति अजमावल्यास विकासाच्या टिकावूपणाचा प्रत्यय आपल्या चित्तांत ठसणें अधिक शक्य होईल. अशा प्रकारानें अनेक दृष्टिकोण पत्करून देशभक्ति निदर्शनाच्या अभावासंबंधीच्या अपेक्षा विरुद्ध वादविवाद करितां येण्यासारखा आहे. विशेषतः गेल्या दहा वर्षांतील परिस्थितींत सुस्पष्ट आणि तीव्र देशभक्तीचा अनुभव येत नाहीं असें जेव्हां म्हणण्यांत येतें तेव्हां त्याच्या विरुद्ध अशी विचारसरणी पुढें करण्यासारखी आहे कीं, हिंदुस्थानाची राज्यक्रांति अहिंसक पद्धतीनें झाल्यामुळें. रक्तलांछित व आततायी राज्यक्रांतीची संवय ज्यांच्या मनास झाली आहे आणि त्या क्रांतीच्या विचाराच्या मोजमापानें समाजोद्धाराकडे जे पहातात, त्यांना ह्या सात्त्विक हळूंहळूं होणाऱ्या प्रगतीच्या सौम्य गतीनें समाधान मिळूं शकत नाहीं. सामाजिक वातावरणांत धडपडाट, गडबड, गडगडाट, संघर्ष ऐकूं आल्यावाचून समाज निश्चयानें व जलद गतीनें बदलत आहे हें त्यांच्या ध्यानांत येऊं शकत नाहीं. कारण प्रचंड लाटा उठलेल्या समुद्राची शोभा आणि शांत सागराचें वैभव ह्या दोन्ही प्रकारच्या दृश्यानें निरनिराळ्या मनोवृत्तीच्या प्रेक्षकांस सौंदर्य-प्राप्ति होत असते.

### अनुभवाचा प्रश्न

परंतु राष्ट्रभक्ती अंतर्धान पावल्याची अंतर्बाह्यसद्यःकालीन प्रचीति हा अनुभवाचा विषय आहे. तो बुद्धिचापल्यानें, वादविवाद पटुत्वानें सिद्ध-असिद्ध व खंडन-मंडन करण्याचा विषय नाहीं. सर्व सुबुद्ध नागरिकांस हिंदुस्थानाचें सर्वांगीण कल्याण झालें पाहिजे अशी इच्छा असणें अगदीं स्वाभाविक आहे, आणि तें झपाट्यानें दृष्टिपथांत आलें पाहिजे अशीहि प्रत्येकांस वांछा आहे. मग ही त्याची इच्छा त्याच्या आचरणांतून उतरलेली असो कीं नसो. ज्याप्रमाणें स्वराज्यप्राप्ति पूर्वकाळांत प्रत्येक विचारी मनुष्याचें राजकीय स्वातंत्र्य किंवा परकीय राज्य निर्मूलन हें हवेसें वाटणारें ध्येय होतें. त्याचप्रमाणें हिंदुस्थानाचें सर्वांगीण त्वरित कल्याण हें स्वराज्यप्राप्त्युत्तर काळांत प्रत्येक सुबुद्ध नागरिकाचें ईप्सित आहे.

स्वराज्यप्राप्ति पूर्वकाळांत गेल्या पन्नास वर्षांत, असे लोक दिसून येत होते कीं, ज्यांच्या आचरणांत स्वातंत्र्य प्राप्ति प्रीत्यर्थ करण्यांत येणारी तपश्चर्या कमी-अधिक प्रमाणांत प्रतिबिंबित झालेली नजरेस येई, आणि आपलें स्वतःचें आचरण जरी ध्येय-दृष्टीनें पतित आहे अशी प्रामाणिक नागरिकास जाणीव असली तरी इतर कांहीं लोकांचें आयुष्य स्वातंत्र्यप्राप्तीच्या उद्देशानें सत्कारणी लागत आहे हें पाहून निरनिराळ्या श्रेणींतील सुबुद्ध मनुष्यास थोडेंबहुत समाधान मिळूं शकत होतें. आजची परिस्थिति अत्यंत विपरीत आहे; आणि ध्येय-दृष्टीनें निरीक्षण केल्यास अतिशय असमाधानकारक आहे असें दिसून येत आहे; आणि भारतीय प्रगतीच्या दृष्टीनें विचारी मनास संतोषजनक प्रत्यंतर मिळूं शकत नाहीं.

राजकीय स्वातंत्र्यप्राप्तीच्या काळापासून, देशभक्तीच्या प्रत्यंतराची कसोटी लावल्यास एक प्रकारची पोकळी, वैफल्य, कमीपणा, असफलता वाढीस लागलेली दिसते. गरजा वाढवून त्या पुरविण्याची तयारी होत असतांना मानसिक समाधानाची भावनादेखील सफल होईल, आणि उज्ज्वल देशभक्तीचा प्रत्यय येईल अशी काळजी घेणें अत्यंत आवश्यक आहे. सध्यांच्या सामाजिक वातावरणांत ही काळजी कितपत घेतली जाते हा एक प्रश्नच आहे. यामुळें असमाधानाचें व असंतोषाचें प्रमाण वाढीस लागत आहे. ही घटना विचारणीय व अस्वस्थता निर्माण करणारी आहे, एवढेंच नाहीं, तर चिंतनीय व गोंधळविणारीहि आहे. समाजाबद्दल विचार करणारास ह्या वाढत्या असंतोषावर कांहीं तोड काढणें आवश्यक आहे. कारण प्रस्तुत प्रगतीच्या वेगांत ह्या विशिष्ट मनोवृत्तीमुळें अडसर पडत आहेत आणि देशाच्या प्रगतीच्या भवितव्याबद्दल व्यग्रता निर्माण होत आहे.

### कॉंग्रेस पक्षाची जबाबदारी

बाह्यप्रमाणांत योग्य रीतीनें देशभक्ति निदर्शनास येऊं शकत नसल्यामुळें निर्माण झालेल्या वैफल्याच्या भावना आणि ध्येयवादाची पोकळी निर्माण करण्यांत कॉंग्रेससंस्थेनें, तिच्या संघटनेनें बराच मोठा वाटा उचललेला आहे असें विधान करण्यांत चूक होणार नाहीं. स्वातंत्र्यप्राप्ति पूर्वकाळांत ह्या संघटनेनें परिणामकारक यश मिळविलेलें होतें. हिंदुस्थानभर ह्या संस्थेचा दबदबा, वजन व वर्चस्व दिसून येत असे. परकीय सरकारशीं प्रत्यक्षपणें दोन हात करण्यांत ह्या संस्थेचा पुढारीपणा होता. इतर राजकीय संस्था देशोद्धाराच्या निराळ्या दिशा दाखवीत असल्या, व त्याकरितां मानसिक व








शारीरिक कष्टमय अवस्थांस तोंड देत असल्या तरी तुलनेनें कॉंग्रेसचा मार्ग अधिक व्यवहार्य, विचारणीय, अखिल जनतानुकूल, सर्वसंग्राहक, प्रतिपक्षीयांचें लक्ष वेधणारा ठरून, जनतेच्या प्रत्ययास तो जसजसा हळूं-हळूं येऊं लागला, तसतसा जनतेच्या मनाची पकड घेण्यास तो समर्थ ठरला. हिंदुस्थानाच्या प्रगतीची, अभ्युदयाची, ध्येयतत्परतेची आशा ह्या संस्थेंत उत्तरोत्तर गेल्या चाळीस-पन्नास वर्षांत केंद्रीभूत झाली. परंतु स्वातंत्र्योत्तर काळांत गेल्या दहा वर्षांत ह्या संस्थेंत महत्त्व पावलेल्या पुरुषांकडून संस्थेच्या ध्येयवादास उजळा मिळूं शकला नाहीं. त्याग, कष्ट, तपश्चर्या, ध्येयवादाची कळकळ व निष्ठा हे गुण संघटनेमधील बहुसंख्य सभासदांकडून व्यक्त झाल्याशिवाय संस्थेबद्दलचें वजन, कार्यक्षमता व आकर्षकपणा वृद्धिंगत होणें कठीण आहे. स्वातंत्र्योत्तर काळांत वैयक्तिक महत्त्वाकांक्षा, अधिकार-लालसा, व्यक्तिनिष्ठ वैभवप्राप्तीचा हव्यास, संपत्ति-निर्मित सर्व प्रकारचे व्यामोह ह्यांनीं सभासदांची मनें भारून गेलीं आहेत असें जनतेस दिसून येऊं लागलें.

१० वर्षांपूर्वी कॉंग्रेससारख्या महत्त्वाच्या राजकीय संस्थेस नवीन राज्यस्थापनेची जबाबदारी पत्करणें परिस्थितीमुळें जरूर झालें असेल, आणि देशभक्तीची झळाळी ज्या पुढाऱ्यांच्या जीवनांत अव्याहतपणें अधिक दिसून आली, त्यांना अधिकार-पदांवर अधिष्ठित ठेवणें अपरिहार्य वाटलें असेल. परंतु सध्यां दहा वर्षांनंतर देशांतील राजकीयसंस्थांत वजन प्राप्त केलेले फारच थोडे असे लोक नजरेंत भरतात कीं, ज्यांच्या ध्येयवादाबद्दल व देशभक्तीच्या तीव्रतेबद्दल सर्व लोकांची मान सहजतेनें त्यांच्यापुढें तुकविली जाईल.

अगोदरच राजकीय पारतंत्र्यामुळें स्वराज्यप्राप्तीच्या मूल्यांस गेल्या अर्धशतकांत अतोनात किंमत आलेली होती. त्या मूल्याच्या तुलनेनें, धर्म, समाजसुधारणा, पतितोद्धार, वाङ्मय, शिक्षण, शुद्ध परोपकार आणि कलांमधील नैपुण्य, ह्या मूल्यास गौणपणा आलेला होता. राष्ट्रांत राजकारण हेंच सर्वांशीं प्रमुख बनलें होतें. स्वातंत्र्यप्राप्तीनंतर राजकारणाच्या क्षेत्रांत बाहेर उमटून दिसणारा ध्येयवाद हळूंहळूं अस्तंगत होऊं लागला आणि सध्यां तर देशभक्त कोणास म्हणावें, आणि देशभक्तीचें बाह्य प्रत्यंतर कोणतें समजावें हा प्रश्न सोडविण्यास कठीण मानला जाऊं लागला आहे.

## देशभक्ती व अधिकारपदाचें नातें

ज्या अर्थी प्रस्तुत सरकार व त्याला पायाभूत असलेला राजकीय पक्ष आमचें समाधान करूं शकत नाहीं त्या अर्थी ह्या सरकारास प्रतिस्पर्धी दुसरा प्रबळ पक्ष देशांत निर्माण झाल्याशिवाय उज्ज्वल भविष्याची आशा करण्यास जागा नाहीं. ह्या विचारसरणीनें राजकारणी लोकांचीं मनें व्याप्त झालीं असल्यास त्यांत नवल नाहीं. परदेशी सुसंस्कृत राष्ट्रांचीं उदाहरणें पाहून ह्या विचारसरणीचें समर्थन करण्यांत येत आहे. परंतु अधिक विचार केल्यास असें दिसेल कीं, कॉंग्रेस हा राजकीय पक्ष ह्या नात्यानें गेल्या पन्नासवर्षांत पुढें आलेला नाहीं. देशांतील स्वराज्य व स्वातंत्र्य भावनेस आंदोलनाची भरती येऊन कॉंग्रेस ह्या नांवाखालीं स्वातंत्र्योन्मुख जनता एकत्रित झाली; आणि तिनें एक आघाडी बनविली, असें ह्या संघटनेचें ऐतिहासिक स्वरूप आहे. स्वातंत्र्यप्राप्तीनंतर ह्या संघटनेचें स्वरूप पूर्णपणानें बदलून राजकीय पक्षाचें स्वरूप गेल्या दहा वर्षांत ह्या संघटनेस आलें. तिच्यामधील लढाऊपणा, ध्येयदृष्टि, स्वार्थत्यागादि गुण ह्या काळांत अजीबात नष्ट झाले. जेव्हां साधुतुल्य समजले गेलेले बाबू राजेंद्रप्रसादासारखे महाभाग राजप्रासादांत रममाण झालेले दिसून येऊ लागले, तेव्हां त्यांच्याहून गुणांनीं पुष्कळ प्रमाणांत कमी असलेले इतर मंत्रिपदारूढ सज्जन आणि अधिकारपदावर स्थिर झालेले इतर अंमलदार यांनीं जनतेस देशभक्तीसाठीं स्वार्थत्यागाचा उपदेश केला किंवा तसें आवाहन केलें तर त्याचा फारसा परिणाम दिसून येऊं शकत नाहीं हें सांगण्याची गरज नाहीं. आणि ह्या काळांत अंतःस्फूर्तीनें आपल्या लोकांचें अनेक प्रकारचें दैन्य नष्ट करण्यासाठीं अहमहमिकेनें पुढें येणाऱ्या स्वयंसेवकांस अनुकूल वातावरण नाहीं हें स्पष्ट आहे. हा सामाजिक, मानसिक बदल देशभक्तीशीं अधिकारपदाचें नातें जोडल्यानेंच मुख्यत: घडून आलेला आहे. आणि सद्यःपरिस्थितींत राज्यसंस्थेकडूनच देशोद्धाराच्या कामास आरंभ होऊन तीं सिद्ध होऊं शकतात, हें विधान सर्वस्वी मान्य केलें तर सरकारपक्षास प्रतिस्पर्धी अशा राजकीय बलाढ्य पक्षास अधिकारपदप्राप्ति आपणांस झाली पाहिजे आणि नंतर आपण प्रस्तुत सरकारांपेक्षां अधिक कार्यक्षमतेनें राज्यकारभार चालवूं अशी ईर्षा व खात्री वाटली तर त्यांत अयोग्य कांहीं नाहीं.

सामाजिक आदर्श, ध्येयदृष्टि आणि अधिकारपदें ह्यांची सांगड घातल्यानें किंवा त्यांचा एकजीव केल्यानें समाजाच्या प्रगतीच्या गतीस तीव्रता आणि उज्ज्वलता आणतां येत नाहीं. उदात्त भावनांचा समाजांत उद्भव झाल्याशिवाय सत्कार्याच्या प्रेरणेचा फैलाव होऊं शकत नाहीं. भावना आणि कार्य ह्यांचा अन्योन्य संबंध आहे. कोणत्याहि राजकीय पक्षाचा संबंध अधिकार-प्राप्तीशीं निगडित झालेला आहे. अधिकार आणि आदर्श एका रेषेंत समांतर चालूं करितां येत नाहींत. म्हणून आदर्शवादी व्यक्तिसमूह आणि अधिकारवादी सामाजिक गट हे भिन्न, अलग, व एकमेकांशी गल्लत न करणारे असले पाहिजेत. आपल्या देशांत गेल्या दहा वर्षांत ह्या बाबतींतील विचारांचा संभ्रम फार पसरलेला आहे. पूर्वीच्या आदर्शवादी व्यक्ति सांप्रत अधिकार-पदांवर आरूढ झाल्यामुळें सर्व सामाजिक उन्नतीचे कठीण प्रश्न निर्माण झाले आहेत असें विचार केल्यास दिसून येईल.

## विरोधी पक्षापेक्षां अधिक महत्त्वाची गरज

लोकशाही यशस्वी करावयास दोन प्रबल राजकीय पक्ष लागतात हें तत्त्व फक्त अल्पांशानेंच सत्य ठरूं शकतें. एका राजकीय पक्षाचा शह दुसऱ्या राजकीय पक्षास प्रसंगविशेषीं देतां येतो. एकमेकांची स्पर्धा आणि आदरमिश्रित भीति असली म्हणजे गुणप्रकर्ष त्या संघर्षापासून निर्माण होणें शक्य आहे. परंतु राज-कीय पक्षांच्या बाहेर निःपक्ष, ध्येयवादी व निःस्वार्थ लोकांचें वजन, दबदबा, प्रकाश व प्रेरणा असल्या-शिवाय कोणतीहि राज्यसंस्था सुव्यवस्थितपणें चालविणें व ती प्रगतिशील राखणें कठीण आहे. देशांतील सत् प्रेरणा अधिक कार्यक्षम करण्यासाठीं राज्यसंस्था उपयोगी पडूं शकते ह्यांत शंका नाहीं. कारण ती मुख्यतः दंड-संस्था आहे. परंतु समाजाची पायाभरणी आदर्शवादी लोकांकडून झाल्याखेरीज विशिष्ट शिल्प-पद्धतीची आरोग्यपूर्ण व उपयुक्त सामाजिक इमारतीची निर्मिती होऊं शकणार नाहीं.

गेल्या दहा वर्षांत आदर्शवादी लोकांची प्रतिष्ठा देशांत वाढली आहे असें दिसून येत नाहीं. जे आदर्शवादी म्हणविले जात होते तेहि राज्यसंस्थेनें आत्मसात केलेले दिसतात. डॉ. राधाकृष्णन् सारखे श्रेष्ठ बुद्धिनिष्ठ ग्रंथकार राज्यसंस्थेच्या आहारी गेलेले आहेत. आणि श्रीकृष्णम्माचारी, कृष्णमेनन, चिंतामणराव देश-मुख ह्या विशेषज्ञांस शिरोधार्य मानण्यांत येऊं लागलें आहे. नवीन आदर्शवादी व्यक्तीपुढें येण्यास संघटना, अनुकूलता व सवड जर नाहीं तर त्या व्यक्तींची प्रतिष्ठा राज्यसंस्थेस जाणवून ती समाजाच्या दृष्टोपत्तीस आणणें हें संभवत नाहीं. तथापि आदर्श निर्माण करणाऱ्या सुप्रतिष्ठित व्यक्ती वनवासी सिंहाप्रमाणें एकेकट्या असूनहि समाजाच्या प्रगतीस इष्ट तें साहाय्य मिळूं शकत नाहीं. राज्यसंस्थेवर त्यांच्याकडून सुधारणेच्या हेतूनें परिणाम घडून यावयाचा असल्यास त्यांचें ऐक्य निर्माण होण्याची आवश्यकता असते. आपली लोक-शाही अगदीं बाल्यावस्थेंत आहे. आदर्शवादी लोकांनीं ती दहा वर्षांपूर्वीं निर्माण केली आहे. परंतु ह्या गेल्या दहा वर्षांत त्या संस्थेंतून आदर्श अंतर्धान पावलेला आहे. अशा अवस्थेंत जनमानसाचें आकर्षण राज्य-संस्थेकडून घडून येत नसल्यास तें स्वाभाविकच आहे असें म्हटलें पाहिजे.

## विरोधकांची तरी खात्री काय ?

सद्यःस्थितींत विचारी नागरिकाच्या असमाधानाचा व वैफल्याचा पारा चढत्या पायरीवर आहे. ज्या स्त्री-पुरुषांबद्दल सार्वत्रिक आदर व पूज्य बुद्धि प्रांतानिहाय दिसून येऊं शकेल अशा व्यक्तींचा ऱ्हास होत आहे किंवा त्या दिसून येईनाशा झाल्या आहेत. परोपकार, धर्म, विद्वत्ता, साहित्य व कला ह्या मूल्यांचें क्षेत्र राज-कारणापेक्षा संकुचित झालें आहे; आणि राजकारणाच्या तुलनेनें एखाद्या व्यक्तीचा ह्या क्षेत्रांत नामनिर्देश केला गेला तरी त्या व्यक्तीची ही वैभवसंपन्नता सर्वांगीण क्षेत्रांत उपयोगी पडूं शकत नाहीं. राजकारण हेंच एकमेवा-द्वितीय असें प्रांगण बनलेलें आहे. कोणत्याहि संस्थेचें महत्त्व व्यक्तीपेक्षां केव्हांहि अधिक असावें हें समु-चितच आहे; आणि म्हणून काँग्रेस-संस्था व काँग्रेस पक्ष ह्यांचाच बोलबाला सर्वत्र सुरू आहे, हा राजकीय पक्ष अनेक पक्षांपैकीं एक पक्ष सांप्रत बनूं पहात असल्यामुळें त्याला तुल्यबल असा दुसरा पक्ष उभारणें विचारी लोक आवश्यक मानूं लागले आहेत. श्री. राजगोपालाचार्य हे दुसऱ्या प्रबळ पक्षाची आवश्यकता प्रतिपादन करतांना व्यक्तीच्या चारित्र्यावर जोर देतात तर श्री. जयप्रकाश नारायण समाजसत्तावादामधील तत्त्वांच्या आचरणाची कसोटी विरुद्ध पक्षास लावूं पाहतात. ह्या लोकाग्रणीस काँग्रेस पक्षांतील वैगुण्य चांगलें प्रतीत झालें आहे आणि त्यासाठीं योग्य तो



अनुक्रमणिका

उतारा अवश्य शोधला पाहिजे ह्याकडे त्यांची दृष्टि वळलेली आहे. तथापि काँग्रेस पक्षास ज्याप्रमाणें अधिकार-बाधा झाली आहे, त्याप्रमाणें इतर बलिष्ठ पक्षास, काँग्रेसची जागा घेणाऱ्या दुसऱ्या पक्षास ती अधिकारबाधा होण्याची शक्यता नाहीं असें नाहीं. एका विषानें दुसरें विष केव्हां केव्हां उतरतें आणि प्रकृतीस आराम वाटतो ह्यांत शंका नाहीं. पण आरोग्यासाठीं विषाचा उपयोग करण्याऐवजीं चिर-कालिक आरोग्यवर्धक उपचार करितां आल्यास तो कोणासहि इष्टच वाटेल. शिवाय चारित्र्याबद्दल हमी देतां आली तरी मतें निरनिराळीं असल्यास राज्य-कारभार व्यवस्थितपणें चालणें कठीणच आहे. पंडित जवाहरलाल नेहरू किंवा ढेबरभाई, माधवराव गोळवलकर किंवा बॅ. चटर्जी, श्री. अजय घोष किंवा डांगे, काकासाहेब कालेलकर किंवा धीरेंद्र मुजूमदार एकत्र येऊन राज्यकारभार करण्यास तयार झाले असें मानलें तरी राज्ययंत्र योग्य रीतीनें चालेल अशी खात्री देतां येणार नाहीं.

लोकशाही यशस्वी करण्यासाठीं मातबर असे दोन पक्ष असणें जरूर आहे, असें काँग्रेस पक्षाच्या सध्यां-च्या धोरणामुळें आणि पक्षांतील व्यक्तींच्या वागणुकीमुळें विचारी लोकांस वाटूं लागलें आहे. पण ही उपाययोजना तात्पुरत्या उपयोगाची असली तरी दीर्घकालपर्यंत यशस्वी होण्याइतपत तिचा फायदा मिळूं शकणार नाहीं; पक्षाची शास्त्रशुद्ध निर्मिती ही चुटकीसरशी सिद्ध होणारी गोष्ट नाहीं. ध्येय, व्यक्ति व साधनें यांची अनुकूलता पक्षसिद्धीस आवश्यक आहे. लोकशाही यशस्वी करावयाची तर लोकशाहीस व्यक्तीची समानता आणि सार्वत्रिक न्याय ह्या गुणांची प्राथमिक गरज असते हें विसरून चालणार नाहीं. प्रामाणिक विरुद्ध मताबद्दल आदर हा लोकशाहीला आधारभूत आहे. जातिनिविष्ट असमानता व तद्विषयक मूलभूत अन्याय हें तर हिंदुसमाजाचें सध्याचें वैशिष्ट आहे. प्रामाणिक विरुद्ध मतांबद्दल आदर आणि पराभवाबाबत खेलाडू वृत्ति हे गुण मानसिक संस्कृती-च्या उच्च पातळीची खूण आहे आपला समाज लोक-शाहीच्या बाबतींत अगदीं प्राथमिक अवस्थेमध्यें आहे. लोकशाही यशस्वी करावयाची तर सामान्य स्त्री-पुरुष नागरिकांमध्यें लोकशाहीचें तत्त्वज्ञान रुजविण्याची पहिली गरज आहे. ती पुरी करण्यास कितीतरी प्रति-भावान उपदेशकांनीं व ध्येयवादी पुरुषांनीं पाया भरून ठेवण्याची आवश्यकता आहे. तें प्राथमिक कार्य अद्याप जोमानें सुरूहि झालें नाहीं हें जाणत्यांना सांगण्याची गरज नाहीं. म्हणून तुल्यबल पक्षांच्या निर्मितीनें लोकशाहीचे कठीण प्रश्न सोडविले जातील असें मानणें योग्य ठरणार नाहीं.

## एक असफल प्रयत्न

ह्या दहा वर्षांत गांधीजींची परंपरा, त्यांचीं राजकार-णासंबंधीं व संस्कृतिदर्शक विशिष्ट मतें, त्यांच्याबरोबर विधायक कार्य करणाऱ्या जनसेवकांचा मनोविकास लक्षांत घेऊन डॉ. कुमाराप्पा, श्री. आर्य-नायकम्, श्री. धीरेंद्र मुजूमदार प्रभृतींनी, आर्थिक विकेंद्रीकरण, अहिंसक शैक्षणिक विचारसरणी, वैराग्य-पूर्ण साधें जीवन यांकडे जनमानस वळविण्याचा प्रयत्न करून पाहिला. आचार्य विनोबांनीं भूदानयज्ञमूलक ग्रामोद्योगप्रधान आर्थिक क्रांतीचा उपक्रम गेलीं सहा वर्षे सुरू ठेवला आहे. परंतु अद्याप तरी राजकारणांतील निवडणुकी, स्थानिक स्वराज्यसंस्थांचा कारभार, देशांतील आर्थिक विचारसरणी, निरनिराळे राजकीय पक्ष, परदेशी राजकारण, राज्यसंस्था, शिक्षण, धर्म, साहित्य व कला ह्या अनेक घटनांवर ह्या नैतिक आंदोलनाचा, सूक्ष्म सूक्ष्मतर सत्याग्रहतत्त्वाचा, सर्वांगीण अहिंसक ग्रामीण संस्कृति निर्माण करणाऱ्या उदात्त प्रयोगाचा तादृश परिणाम झाला आहे किंवा होत आहे असें ढोबळपणानें प्रत्ययास येत नाहीं. आचार्य विनोबांच्या अहिंसक आर्थिक क्रांतीचा उद्योग, हा आदर्शांचा आदर्श, ध्येयवादांचा ध्येयवाद असें त्याचें वर्णन होऊं शकेल, परंतु हा ध्येयवाद आकाशां-तच विहरत आहे कीं त्याचे पाय जमिनीस टेकलेले आहेत हें अद्याप स्पष्ट होऊं शकत नाहीं. म्हणून ह्या विस्तृतपणानें चाललेल्या प्रयोगामुळें देशांत एक सार्वत्रिक, उदात्त व भव्य भावना निर्माण झाली आहे असें म्हणतां येणार नाहीं.

काँग्रेस सरकारास, साम्यवादी पक्षास आणि पुनः अखंड हिंदुस्थान स्थापनेचा आणि हिंदुस्थानाची सांस्कृतिक पुनरुत्थानाची संघटना करणाऱ्या राष्ट्रीय स्वयं-सेवक संघास जनतेस आकर्षक वाटेल अशी भावना सद्यःस्थितींत उद्दीपित करितां आलेली आहे असें दिसत नाहीं. साम्यवादी पक्ष पददलितांच्या हुकूमशाही क्रांतिकारी राज्यसंस्था स्थापूं पाहणाऱ्या तत्त्वज्ञानाची










कास धरून हिंदुस्थानांत तपश्चर्या करितांना आढळून येतो. परंतु आतां कोठें त्रावणकोर कोचीनमध्यें हा पक्ष राज्य-संस्था चालविण्याइतपत जेमतेम मतें मिळविण्यास समर्थ ठरला आहे. राज्यसंस्था चालवून पाहिल्यानंतर ह्या पक्षाच्या तत्त्वज्ञानांत, व्यक्तीच्या आचरणांत, काय बदल होणार आहे हें आज अजमावणें कठीण आहे. कॉंग्रेस-संस्थेचा कटु अनुभव गेल्या दहा वर्षांत आलेला आहे, आणि उदात्त प्रेरणेशिवाय अधिकारपदाशीं संबद्ध झालेला राजकीय पक्ष घसरणीवरून घरंगळत जातो असें कॉंग्रेसच्या उदाहरणानें स्पष्ट झालें आहे.

**अत्यंत आवश्यक उपाय**

राजकारणास सर्वस्वी महत्त्व सांप्रत आलेलें आहे आणि प्रस्तुत राजकीय परिस्थितीमुळें असमाधान वाढत्याप्रमाणांत आहे. तथापि देशकल्याण इच्छिणाऱ्या विचारी नागरिकानें ह्यांतून मार्ग काढणें जरूर आहे. स्वराज्य प्राप्त झाल्यामुळें आणि तें अनपेक्षिततरीत्या, लवकर, जागतिक अनुकूल परिस्थितीनें, आणि अंशतः अहिंसक पद्धतीनें मिळाल्या कारणानें राजकारभाराचा तोच इंग्रजांचा हुकमतीमधील जुना सांगाडा कायम राहिलेला आहे. इंग्रजांनीं घालून दिलेल्या राज्ययंत्राच्या चाकोरीबाहेर जाणें जागतिक परिस्थितीच्या वर्तुळांत कदाचित फार धोक्याचें ठरलें असतें, राज्यकारभार करणारे परंपरागत इंग्रजनिष्ठ मुरब्बी आय्. सी. एस् अंमलदार, त्यांच्याच पाउलावर पाऊल ठेवून चालणारे नवीन आय्. ए. एस् साहेब, मंत्रिपदावर आरूढ होणारे अननुभवी सचीव, अनेक प्रकारच्या खऱ्या खोट्या श्रेष्ठपणाच्या कल्पनेनें भारलेले वरिष्ठ व प्रांतीय कायदे कौन्सिलाचे सभासद, परदेशांतील अगदीं नवीन राजकारण आणि तेथें आपली प्रतिष्ठा कायम ठेवण्याची जबाबदारी अंगावर घेऊन पडलेले कोरे करकरीत वकील, देशोद्धाराचीं पूर्वीचीं अनेक सुखस्वप्नें पाहणारी आणि प्रत्यक्षांतील मृगजल अनुभवणारी जनता, देशभक्तीचा कधींहि गंध न लागलेले श्रीमान कारखानदार व जमीनदार, इंग्रजांनीं साम्राज्यशाही धोरणानें चाल-विलेल्या युनिव्हर्सिट्यांमधून बाहेर पडलेले उच्च पदवीधर सुशिक्षित अशा अनेक चित्रविचित्र बहुरंगी घटनांनीं सध्यांचें राजकीय वातावरण बनविलेलें आहे. म्हणून मुख्यतः हें सुचवावयाचें आहे कीं, अनेक प्रकारचे वैयक्तिक स्वार्थ, महत्त्वाकांक्षा, सांपत्तिक लालूच, ह्या मोहांतून बाहेर पडण्याची खात्री असणाऱ्या लहान-मोठ्या, सुप्रसिद्ध अप्रसिद्ध लोकांनीं प्रांतानिहाय प्रस्तुतची चिंतनीय देशस्थिति लक्षांत घेऊन अधिकारा-बाहेर कटाक्षानें राहण्याचें कांहीं काळपर्यंत तरी ठरवावें. पुढील पिढ्या ह्याच देशांत आपल्या संततीस घालवा-वयाच्या आहेत आणि त्यांची पुढील आपत्ति टळावी ह्याची क्षिति बाळगावी; आणि आपल्या देशाचें सर्वांगीण कल्याण कशांत आहे ह्याचें संशोधन करावें. ह्या त्यांच्या संघटनेंतून, सांघिक उद्योगांतून, एक-समूहांतून सार्वत्रिक उज्ज्वल भावना निर्माण होण्याची शक्यता आहे. प्रस्तुत परिस्थितींत ज्यांची देशभक्ति स्वार्थनिरपेक्ष आणि संशयातीत आहे असे स्त्री-पुरुष एकत्रित होण्याची फार आवश्यकता आहे.

अधिकार-पदांचा मोह न करितां, त्यापासून दूर राहून देशभक्तीची सर्वांगीण जोपासना करणारें एक मंडळ, संघ, समाज किंवा व्यक्तिसमूह अस्तित्वांत आला पाहिजे. त्यानें राजकीय आणि स्थानिक स्वराज्या-मध्यें आपलें वजन कसें वाढेल, राज्यकारभारांत सुधारणा कशी घडवून आणतां येईल ह्याबद्दल चिंतन केलें पाहिजे. ह्या मंडळांस किंवा समाजास उदात्त, भव्य, दिव्यतेनें आकर्षक अशा कोणत्याहि कार्यक्रमाची आवश्यकता नाहीं. विशुद्ध स्वार्थनिरपेक्ष अशा भाव-नेची व व्यवहारी बुद्धीची फक्त जरूरी आहे. हा व्यक्तिसमूह किंवा संघ गांधीवादी, सर्वोदयी, समाज-सत्तावादी, हिंदुत्वाभिमानी, साम्यवादी, शेतकरी काम-कऱ्यांचा पक्षपाती अशा कोणत्याहि विशिष्ट मताचें कंकण बांधलेला असला पाहिजे असें नाहीं. देशाच्या दैनंदिन प्रगतीचा कळकळीनें विचार करणाऱ्या व उपाय सशोधणाऱ्या व्यक्तींचें हें मंडळ असलें म्हणजे सद्यःस्थि-तींत काम भागण्यासारखें आहे. व्यक्तीमध्यें प्रामाणिकपणा असला आणि स्वार्थलंपटता व स्वमतांचा फाजील अभि-निवेश नसला म्हणजे हें मंडळ विस्तृत होऊन त्यांत बंधुभाव निर्माण होऊं शकेल आणि त्या मंडळाच्या एकत्रित मतास हळूहळू महत्त्व प्राप्त होईल. एवढी पायाभूत संघटना शक्य कोटींत आली म्हणजे तिच्या विचारास आणि देशभक्तीच्या भावनांस व्यवहार्य स्वरूप हळूहळू सहजच आणतां येण्यासारखें आहे. राज्यकारभारासाठीं जी घटना राष्ट्रानें बनविली आहे, ती जमेला धरून तिच्यांत पावित्र्य कसें आणतां येईल आणि लोकशाहीचीं तत्त्वें आचरणांत शुद्धतेनें कशीं प्रतिबिंबित होतील हें ह्या मंडळास आपलें कार्यक्षेत्र ठरवितां येईल आणि त्यांतून राष्ट्रास उपयोगी अशी नैतिक शक्ति निर्माण होण्यास सुसंधी मिळेल. समता, सहकार्य व समंजसपणा ह्या गुणांमधून देशभक्तीचें बाह्य दर्शन जनतेस प्रतीत होऊं शकेल.



अनुक्रमणिका






श्री. वसंत पळशीकर

# ग्रा म दा न — एक परिसंवाद

महाराष्ट्राचे ज्येष्ठ विधायक कार्यकर्ते आणि सेवक श्री. अण्णासाहेब सहस्रबुद्धे यांच्या वयाचीं साठ वर्षे नुकतींच पुरीं झालीं. त्या निमित्तानें त्यांच्या मित्र-मंडळींनीं श्री. अण्णासाहेबांच्या इच्छेनुसार भूदान पदयात्रेचा आणि परिसंवादाचा कार्यक्रम आखला होता. ता. ३० सप्टेंबर ते ६ ऑक्टोबर पुणें जिल्ह्यांतील शिरूर तालुक्यांत ग्रामदानाच्या विचाराचा प्रचार करण्यासाठीं सघन (intensive) पदयात्रा झाली. यांत सहाशेंच्यावर कार्यकर्त्यांनीं भाग घेतला होता. ता. ७ ऑक्टोबर रोजीं पुणें येथें श्री. अण्णासाहेबांचा सत्कार झाला. ता. ८ व ९ ऑक्टोबर रोजीं पुण्यांत ग्रामदानी गांवाच्या पुनर्निर्माणाच्या प्रश्नांचा विचार करण्यासाठीं एक परिसंवाद झाला. जवळ जवळ चारशें लोकांनीं या परिसंवादाचा लाभ घेतला. या परिसंवादांत प्रा. धनंजयराव गाडगीळ, श्री. शंकरराव देव, श्री. रा. कृ. पाटील, डॉ. ग्यानचंद, श्री. अप्पासाहेब पटवर्धन, श्री. अण्णासाहेब आणि इतर अनेक कार्यकर्त्यांनीं भाग घेतला.

## कार्यकर्त्यांचे अनुभव

परिसंवादाच्या सुरुवातीस पदयात्रेंतील कांहीं प्रमुख कार्यकर्त्यांनीं आपले शिरूर तालुक्यांतील अनुभव सांगितले. प्रत्यक्ष एकहि ग्रामदान मिळालें नसलें तरी विचार-प्रसाराचें काम यशस्वीपणें झालें आहे असें सर्वांनीं सांगितलें. ग्रामदानाचा विचार ज्यांना पटला आहे असे कांहीं स्थानिक लोक प्रत्येक गांवांतून निर्माण झाले असून ग्रामदानासंबंधीं प्रत्येक गांवांतून साधकबाधक चर्चा होत आहे. या क्षेत्रांत पुन्हा कांहीं निवडक कार्यकर्त्यांनीं प्रचारार्थ जाण्याची आवश्यकता आहे असें कार्यकर्त्यांनीं सांगितलें. या भागांत शेती सर्वस्वी पावसावर अवलंबून असल्यानें कांहीं सघन बागाईत-जमीनदार सोडले तर बाकीचे लोक अतिशय दारिद्र्यांत जगत आहेत असा सर्वांचा अनुभव होता. तेव्हां केवळ जमिनीच्या फेरवांटपानें आणि ग्रामदानानें शेतीचा प्रश्न कसा सुटेल असें लोक विचारीत. कार्यकर्त्यांनीं आपले अनुभव सांगितल्यावर श्री. एस्. एम्. जोशी यांनीं आपले अनुभव सांगितले. अनेक कामें पाठीशीं असतांना ते ३।४ दिवस एकाच गांवांत राहिले आणि ग्रामदानाचा विचार लोकांना अनेक प्रकारें समजावून सांगितला. ते म्हणाले, "इकडील शेतकरी हा सामाजिक, राजकीयदृष्ट्या शहरांच्या सान्निध्यामुळें जास्त जागरूक असल्यानें ग्रामदानाचा विचार त्याला समजावून द्यायला कांहीं काळ लागेल, घाई करून आपलें काम आपण बिघडवूं. प्रत्येक गांवांत कष्टानें आपली शेती उत्तम रीतीनें करणारे आणि त्या शेतीवर पैसा करणारे कांहीं शेतकरी आज आहेत. त्यांचें मतपरिवर्तन करणें हें काम अवघड आहे. तसेंच गांवांत आज लोकांचा एकमेकांवर विश्वास नाहीं. तेव्हां एकदम ग्रामदानांत आपण यशस्वी होऊं शकलों नाहीं तरी गांवच्या जीवनाला सहकार्याचा आधार निर्माण होईल असे लहानमोठे विशिष्ट कार्यक्रम लोक हातांत घ्यायला तयार असतील तर आपण त्यांना मदत केली पाहिजे, प्रोत्साहन दिलें पाहिजे. त्यांतून परस्पर विश्वासाचें आणि सौहार्दाचें वातावरण निर्माण होऊन ग्रामदान घडवून आणणें



अनुक्रमणिका

सुकर होईल. भूदानांचे वेळीं दयाभावनेला आवाहन केलें तें पुरेसें होतें. ग्रामदानाच्या वेळीं भावनात्मक आवाहनापेक्षां या विचारामागचें व्यवहार्य आर्थिक, तात्त्विक बैठक त्याला समजावून देण्यावर आपण भर दिला पाहिजे."

## परिसंवादाचे विषय

यानंतर परिसंवादाच्या मुख्य कार्यक्रमाला सुरुवात झाली. प्रा. धनंजयराव गाडगीळ अध्यक्षस्थानीं होते. परिसंवादाच्या विषयांची स्थूलपणें चार घटकांत विभागणी केली होती.

(१) ग्रामदान आणि आजच्या कायद्यांचें स्वरूप. (२) शेतीसुधारणा आणि शेतीकरितां लागणाऱ्या कर्जाच्या व्यवस्थेचा प्रश्न. (३) ग्रामदान-गांवांतील कारभाराची व्यवस्था आणि शिक्षण व्यवस्था (४) ग्रामदानामागची तात्त्विक आणि नैतिक भूमिका. सुरुवातीस महाराष्ट्रांतील भूदान-कार्याचे संयोजक यांनीं महाराष्ट्रांतील दोनएकशें ग्रामदानांच्या अनुषंगानें निर्माण होणारे प्रश्न मंडळीं-समोर मांडले. ते म्हणाले, "ग्रामदान स्वीकारतांना ग्रामाचें क्षेत्र सरकारी रेव्हेन्यू गांवाइतकेंच असलें पाहिजे असा आग्रह धरायचा कीं, एका वाडीचें दान हेंहि ग्रामदानांत धरायचें ? गांवांतील सर्व जमीनदारांनीं आपल सर्वस्वदान दिलें तरच तें ग्रामदान मानायचें कां ग्रामदानाच्या व्याख्येंत आंशिक ग्रामदानाला जागा द्यायची ? गांवच्या पुननिर्माणाकरतां बाहेरून मदत घ्यायची कां ? तिचें स्वरूप व मर्यादा काय ? गांवानें प्रथम शेती सुधारणाच केली पाहिजे असा कार्यकर्त्यांनीं आग्रह धरायचा कीं लोकांचा निर्णय अंतिम निर्णय मानायचा ? अशा प्रकारचे व्यावहारिक प्रश्न आज निर्माण झाले आहेत आणि त्यासंबंधीं कार्यकर्त्यांना या परिसंवादां-तून मार्गदर्शन मिळावें अशी अपेक्षा आहे."

## कोरापुटचा प्रयोग

प्रा. गाडगीळांनीं श्री. अण्णासाहेबांना आपल्या कोरापुटच्या कामांतील अनुभवांच्या आधारें ग्राम-दानी गांवांच्या पुनर्निर्माणाच्या प्रश्नांचें सांगोपांग विवेचन करण्याची विनंति केली. श्री. अण्णासाहेब गेलीं दोन वर्षें ओरिसा राज्यांतील सुमारें अडीच हजार ग्रामदानी गांवाच्या पुनर्निर्माणाच्या योजनेचें संचालन करीत आहेत. ते म्हणाले, "पाश्चात्त्य देशांत ज्या प्रकारची समाजरचना औद्योगिक क्रांतीमुळें अस्तित्वांत आली ती शहरकेंद्री आहे आणि ग्रामीण भागांचें शोषण करणारी आहे. पाश्चात्त्य देशांच्या ज्या वसाहती जगभर पसरलेल्या होत्या त्यांचा उपयोग भांडवलसंचयाकरतां ते करूं शकले. आपल्या देशाची आर्थिक गरीबी आणि फाजील लोकसंख्या लक्षांत घेतल्यानंतर आपल्याला औद्योगीकरणाचा पाश्चात्त्य आदर्श पुढें ठेवतां येणार नाहीं. येथील भावी समाजरचना ग्रामकेंद्रीच असली पाहिजे. शहरांनीं गांवाचें शोषण करायचें हें शक्य नाहीं आणि इष्टहि नाहीं कारण बहुसंख्य जनता आज आणि पुढेंहि खेड्यांतून राहील.

"ग्रामीण शेतीव्यवस्था सुधारल्याखेरीज, शेती आर्थिकदृष्ट्या परवडणारा एक उद्योग झाल्याखेरीज औद्योगीकरणाच्या सर्व योजना अपेशी ठरतील. शेती-चा प्रश्न म्हणजे जमीनमालकीचा प्रश्न, फेरवाटपाचा प्रश्न, सुधारलेलीं औजारें, बी-बियाणें, खतें वापर-ण्याचा प्रश्न, पाण्याचा प्रश्न, कर्जाचा प्रश्न, हे सर्व प्रश्न एकमेकांशीं संबंधित आहेत. आज महाराष्ट्रांतील शेतकऱ्यांत तीन स्तर आहेत. प्रत्येक स्तर हा इत-रांच्या शोषणावर जगूं पहातो. अशा व्यवस्थेंत सामर्थ्यवान् आणि संपन्न शेती कशी निर्माण करतां येईल. ग्रामदान हा त्यावर एकमेव उपाय आहे.

"ग्रामदानाची एकच व्याख्या आणि एकच प्रकार अशी साचेबंद भूमिका घेऊन चालणार








नाहीं. कोरापुटमध्यें आठ प्रकारचीं ग्रामदानें अस्तित्वांत आहेत. पुनर्वितरणांतहि प्रत्येक गांवांत फरक आढळेल. आपली भूमिका लवचिक असली पाहिजे.

" कर्जाचा प्रश्न हा शेतीसुधारणेंतील सगळयांत महत्त्वाचा प्रश्न आहे. ग्रामदानीं गांवांत सावकार कर्ज द्यावयास नाकारतो आणि जमिनीची सिक्युरिटी नसल्यानें कोऑपरेटिव्ह बँकहि कर्ज देऊं शकत नाहीं. त्यासाठीं खास व्यवस्था करावी लागणार आहे. पण पुरेसा पैसा वेळींच शेतकऱ्याला उपलब्ध झाल्याशिवाय शेती संपन्न बनविणें अशक्य आहे.

" त्या नंतरचा महत्त्वाचा प्रश्न ग्रामीण नेतृत्व निर्माण कसें करावयाचें हा आहे. आज सधन आणि उच्च जातीच्या हातांत नेतृत्व आहे. त्या लोकांचें मानस बदलेल कां ? यांत शिक्षणाचें कार्य काय ? सामुदायिक कल्याणाचीं जीं कामें श्रमदानांतून होतील त्याचा मोबदला द्यावा कां आणि दिला तर कसा द्यावा ? गांवचा कारभार कसा चालावा ? गांवांतल्या सर्व प्रौढ लोकांनीं मिळून तो चालवावा कीं प्रत्येक कुटुंबांतून एक प्रतिनिधि घेऊन त्यांचे एक मंडळ असावें. भांडवलसंचय गांवांत कसा होईल ? होईल ? या व इतर अनेक प्रश्नांचीं उत्तरें आम्हांला स्वतःच्या हिमतीनें, चिंतनानें द्यावीं लागणार आहेत म्हणूनच ग्रामदानी गांवांच्या पुनर्निर्माणाचें काम हें एक आमच्या व्यक्तित्वाला रोमांचकारी आवाहन आहे." आपल्या भाषणाच्या शेवटीं श्री. अण्णासाहेबांनीं उत्तर प्रदेशांतील मंगरौठ गांवची हकीकत सांगितली. गांवानें स्वकष्टानें बाहेरच्या आर्थिक मदतीचा लाभ घेऊन शेतींतलें उत्पादन इतकें वाढविलें कीं आज त्यांना सर्वांना पुरून उरेल इतकें तेथें पिकतें. पूर्वी त्याच गांवांतल्या शे-सव्वाशें लोकांना बाहेर रोजगार करावा लागे आणि गांवांत पुरेसें अन्न पिकत नसे. गांवांत इतर उद्योगधंदेहि सुरू केले जात आहेत.

## व्यक्तिगत मालकी नको

ग्रामदानाच्या कांहीं निश्चित कसोट्या आपण निर्माण केल्या पाहिजेत. त्या पूर्ण केल्या नाहींत तर ग्रामदानाचें कांहीं कालावधीनंतर पुन्हां व्यक्तिगत मालकीव्यवस्थेंत रूपांतर होईल हा धोका ध्यानांत घेतला पाहिजे असें प्रा. गाडगीळांनीं सांगितलें. ग्रामदानाच्या आपल्या कसोट्या स्पष्ट करतांना ते म्हणाले, " ग्रामदानानें शेतींतील व्यक्तिगत मालकी कायमची नष्ट झाली पाहिजे, समता प्रस्थापित झाली पाहिजे, निश्चित कालावधींत शेतीचें उत्पादन पुष्कळसें वाढलें पाहिजे आणि समाजपरिवर्तनाच्या प्रक्रियेंत सातत्य आणि गतिशीलता राहील अशी दक्षता बाळगली पाहिजे. ग्रामदानी गांवानें प्रथमतः सावकार आणि व्यापारी या दोन शोषणाच्या प्रमुख समाजसंस्थांचें उच्चाटन केलें पाहिजे. तसेंच गांवांतले जे मोठे जमीनमालक त्यांचेंहि वर्चस्व टिकूं देतां कामां नये, कारण ते सावकार आणि व्यापारी यांच्याशीं संगनमत करून असतात. या तीन हितसंबंधाचें उच्चाटन गांवांतून केल्याशिवाय गांवाची प्रगति अशक्य आहे. गांवांतील उत्पन्नाची विक्री करण्यासाठीं बाहेरून आणावयाच्या मालाच्या खरेदी आणि वितरणासाठीं, शेतीकरतां लागणाऱ्या कर्जासाठीं, सहकारी संघटना उभ्या करूनच या हितसंबंधांना खची करणें शक्य आहे.

"ग्रामसंकल्पांतून ग्रामदान होतें. ही ग्रामसंकल्पाची प्रक्रिया गतिशील आणि योग्य मार्गावर राहील याची खबरदारी घेतली पाहिजे. त्याकरता आवश्यक तें संघटन उभें केलें पाहिजे. मला असें वाटतें कीं या बाजूकडे भूदान कार्यकर्त्यांचें दुर्लक्ष होत आहे.

" आज देशामध्यें जो नियोजनाचा कार्यक्रम अमलांत येत आहे त्याची दिशा उद्योग, अर्थ व राज्यव्यवस्थेंच केंद्रीकरण करण्याकडे आहे. ग्रामदानाच्या चळवळींतून एक विकेंद्रित समाजव्यवस्था निर्माण करण्याचा जाणीवपूर्वक आणि संघटितरित्या








प्रयत्न झाला पाहिजे. नाहींतर ग्रामदान चळवळीनें विचारवंतांचा अपेक्षाभंग केला असें होईल.

## ‘कांचनमुक्ति’ व स्वयंपूर्णता

त्यानंतर डॉ. ग्यानचंद यांनीं आपले विचार मांडले. डॉ. ग्यानचंद यांनीं अनेक विद्यापीठांतून अर्थशास्त्राच्या अध्यापनाचें कार्य केलेलें आहे. ते भारत सरकारचे आर्थिक सल्लागारहि होते. कम्युनिस्ट राष्ट्रांच्या अर्थव्यवस्थांचा त्यांचा विशेष अभ्यास आहे. प्रथम माणसाच हृदयपरिवर्तन झालें पाहिजे, त्याशिवाय समाजक्रान्ति होऊं शकत नाहीं याबाबत मार्क्सवाद, सर्वोदय आणि लोकशाही तत्त्वज्ञानांत मतैक्य आहे असें त्यांनीं सांगितलें. आपल्याकडे लोकसंख्या जास्त असल्यानें सर्वांनीं असेल तें वाटून खावें या तत्त्वावर गांवची अर्थरचना उभी करावी लागेल. आज ‘खुल्या बाजारांचें अर्थशास्त्र अस्तित्वांत आहे आणि पैसा हेंच प्रमुख मूल्य झालें आहे. यामुळें शेतकरी व खेडेगांवांतला रहिवासी पिळून निघतो आणि व्यापारी, दलाल वर्गाची चलती होते. म्हणून कांचनमुक्ति आणि स्वयंपूर्णतेच्या तत्त्वावर आधारलेली ग्रामीण अर्थरचना निर्माण करण्याची गरज त्यांनीं स्पष्ट केली.

ग्रामीण उत्पादन आणि शहरी भागांतील उद्योगधंद्यांतून होणारें उत्पादन यांचें प्रमाण कधीं समान राहूं शकेल काय ? असा प्रश्न श्री. रा. कृ. पाटील यांनीं उपस्थित केला. स्वयंपूर्णतेच्या तत्त्वामाग शोषण थांबविण्याची प्रेरणाच मुख्यत्वेंकरून आहे असें त्यांनीं सांगितलें. ग्रामदानानें जमिनीची व्यक्तिगत मालकी कायमची नष्ट झाली हें सर्वांना स्पष्ट झालें पाहिजे. व्यक्तिगत शेतीची पद्धती जोपर्यंत राहील तोपर्यंत जमिनीवरच आसक्ती राहील व मालकीची भावना निर्माण होईल. म्हणून निश्चित कालानंतर पुन्हां पुनर्वितरण करणें आवश्यक ठरेल. आजच सहकारी किंवा सामुदायिक शेती करणें उघडच अशक्य आहे. कारण लोकांना ती कल्पना कळणारच नाहीं. तसेंच व्यक्तिस्वातंत्र्यावर ग्रामदानी गांवांतील व्यवस्थेंत मर्यादा व बंधनें पडणार नाहींत अशी खबरदारी आपण घेतली पाहिजे असें विवेचन त्यांनीं केलें.

विनोबाजींच्या ग्रामदान आंदोलनानें भारतीय जनमानसांत एक आशा पालवली आहे. पण प्रत्यक्ष ग्रामदानी गांवांत आपल्याला नव्या समाजाच्या आगमनाचीं चिन्हें दिसत नाहींत. विनोबाजींनीं कल्पिलेलें धर्मचक्रप्रवर्तन कसें होईल ? आज देशभर पदयात्रा निघत आहेत पण केवळ विचारप्रचार हा पुरेसा नाहीं. लोकांना नवसमाजाच्या दिशेनें घेऊन जाण्याच्या दृष्टीनें त्यांच्यांतील कर्तृत्व व उत्साह जागृत करणें, त्यांना एक एक पायरी दाखवून देणें हीं महत्त्वाचीं कामें करण्याकरतां आपण पुरेसे कार्यकर्ते व आवश्यक तें संघटन तयार केलेलें नाहीं. हे कार्यकर्तेच क्रांतीच्या प्रक्रियेंतील सर्वांत महत्त्वाचे घटक आहेत याकडे दुर्लक्ष करून चालणार नाहीं असा इशारा श्री. अच्युतराव पटवर्धन यांनीं दिला. ते पुढें म्हणाले कीं, भूदानांत ५० लाख एकर जमीन मिळाली हें खरें पण त्याहून जास्त जमीन धुपून गेली आहे हेंहि विसरतां येणार नाहीं. आपल्याजवळ आहेत त्या तोकड्या आर्थिक आणि तांत्रिक साधनांचा जास्तींत जास्त उपयोग सहकारी पद्धतीनें करून ग्रामदानी गांवांत शेतीचें उत्पन्न वाढतें हें दाखवून दिलें पाहिजे. गांवांत नवीन उद्योगधंदे सुरू केले पाहिजेत. लोकांत संशोधनाची डोळस प्रवृत्ति जोपासली पाहिजे. त्यांच्यातील सृजनशक्तीचा सर्व क्षेत्रांत आविष्कार होईल याकरतां प्रयत्न झाले पाहिजेत. या कामांत कर्तृत्व आणि निष्ठा या गुणांची नितांत आवश्यकता आहे. अण्णासाहेब हे तरुणांना आदर्शभूत ठरावेत.

## खुल्या चर्चेतील विवेचन

८ तारखेला दुपारीं चर्चा सर्वांना खुली करण्यांत आली. त्यांत अनेकांनीं भाग घेतला. पुण्या-

जवळील सुभाष सहकारी शेतकी संघाचे चिटणीस श्री. मायदेव यांनीं सामुदायिक शेतीला ग्रामदानी गांवांत उत्तेजन दिलें गेलें पाहिजे त्याशिवाय शेतींत आवश्यक त्या सुधारणा करणें अवघड जाईल असें सांगितलें. तसेंच सामुदायिक शेतींत सुधारलेलीं किंमती औजारें वापरणें, पाण्याची सोय करणें, जमीनसुधारणा, पिकांची योजना, इत्यादि बाबतींत जास्त प्रगति करतां येते असा आपला अनुभव सांगितला. 'सर्विस कोऑपरेटिंग' चालवायला तरी त्याला तज्ज्ञ लोक लागणारच तेव्हां त्यांचा उपयोग सामुदायिक शेतीसाठीं कां करूं नये असें त्यांनीं विचारलें. सामुदायिक शेतीनें व्यक्तिस्वातंत्र्यावर अपरिहार्यपणें घाला येईल ही भीति आपल्याला निराधार वाटते असें त्यांनीं सांगितलें. प्रा. दाभोळकरांनीं भारतांतील सर्व गांवें ग्रामदानी झालीं तर पुरेसा पैसा आणि कार्यकर्ते आपल्यापाशीं नाहींत म्हणून प्रत्येक गांवाला उपयुक्त ठरेल अशा दृष्टीनें पुनर्निर्माणाच्या प्रश्नाचा विचार होण्याची आवश्यकता स्पष्ट केली. त्या दृष्टीनें आजच्याप्रमाणें महत्त्वाकांक्षी योजना न बनवितां विशिष्ट आणि मर्यादित असा सर्वसाधारण कार्यक्रम आंखावा अशी सूचना केली. तसेंच खाजगी मालकी नष्ट करायची असें आपण वारंवार म्हणतों पण त्या घटनेचे दूरगामी परिणाम काय होतील याचा, रशिया आणि चीनमधील अनुभव ध्यानांत ठेवून, गंभीरपणें विचार केला पाहिजे असें सांगितलें. मुंबईच्या पोदार कॉमर्स कॉलेजमधील प्रा. बापट यांनीं ' प्लॅनिंग फॉर सर्वोदय ' या पुस्तकांतील विचारसरणींत आणि विनोबा आणि इतर सर्वोदय विचारकांच्या लिखाणांत एकवाक्यता नसते हें सोदाहरण दाखवून विचारस्पष्टतेची आवश्यकता प्रतिपादन केली. मुंबई असेंब्लींतील कम्युनिस्ट आमदार श्री. व्ही. डी. चितळे यांनी भाव-नियंत्रण आणि शेतकी मालाची किंमत उचलून धरण्यासाठीं द्यायची मदत आणि त्याबाबतचें सरकारचें कर्तव्य याबाबत सर्वोदय कार्यकर्ते पुरेसें लक्ष देत नाहींत आणि या दोन गोष्टी झाल्याशिवाय शेतकऱ्याच्या जीवनांत सुरक्षितता निर्माण होऊं शकणार नाहीं असें सांगितलें.

यानंतर ग्रामदानाच्या व्याख्येसंबंधीं चर्चा झाली. श्री. शंकरराव देव यांनीं ग्रामदानामागील आध्यात्मिक भूमिका लक्षांत घेणें आवश्यक आहे असें सांगितलें. सर्व जमीन ही ईश्वराची आहे हा विचार ग्रामदानाच्या मुळाशीं आहे. गांवांतील लोकांच्या संमतीनेंच प्रत्येक गोष्ट झाली पाहिजे. ग्रामसंकल्प हीच ग्रामदानी गांवांच्या पुनर्रचनेची प्रक्रिया आहे. कार्यकर्त्यांची भूमिका ही शिक्षकाची भूमिका आहे.

श्री. अप्पासाहेबांनीं ग्रामदानी गांवांतील शेतीव्यवस्थेसंबंधीं कांहीं विचार मांडले. शेतींत सुधारणा व्हाव्यात असें वाटत असेल तर वारंवार फेरवांटप केलें जाऊं नये. कमींत कमी दहा वर्षें ती जमीन त्या शेतकऱ्याकडे राहिली पाहिजे. फेरवांटप करतांना त्यानें त्या शेतावर घेतलेल्या मेहनतीचा विचार होऊन त्याला त्याबद्दल कांहीं मोबदला म्हणूनहि द्यावें लागेल. मुख्य गोष्ट गांवांतल्या लोकांना हें गांव आपलें आहे असें वाटलें पाहिजे. ग्रामपरिवाराची भावना हा ग्रामदानाचा खरा आशय आहे.

श्री. दाते इंजिनिअर हे मध्यवर्ती सरकारच्या नोकरींत एक उच्चपदस्थ अधिकारी होते. ते गेलें वर्ष-दीडवर्ष कोरापुटमध्यें काम करीत आहेत. त्यांनीं आपले अनुभव निवेदन केले. ते म्हणाले, " गांवांत कांहीं थोडी जमीन पाण्याखालीं असते. पाण्याखालची सर्व जमीन गांवानें सामुदायिक करावी व त्यांतून गांवच्या समाजोपयोगी कार्यांचा खर्च चालवावा असें बंधन घालणें कदाचित् आवश्यक ठरेल असें वाटतें. तसेंच गांवांतली सर्व जमीन सारख्याच कसाची नसते. फेरवाटपांत प्रत्येकाला सर्व

प्रकारच्या जमिनींतला समान हिस्सा मिळणें आवश्यक आहे. त्या दृष्टीनें जमिनीचे प्रकार करून प्रत्येक प्रकारच्या जमिनीचे सारख्या आकाराचे प्लॉट्स पाडले पाहिजेत. श्री. रेड्डीजींनीं गरांडा आणि इतर जवळच्या गांवांतून कोरापुट भागांत असें फेरवांटप केलें असून तें अत्यंत यशस्वी झालें आहे. गांवांत आर्थिक आणि सामाजिक समता प्रस्थापित केल्याशिवाय ग्रामराज्य निर्माण होईल असें मला वाटत नाहीं. तसेंच व्यक्तिशः मला असें वाटतें कीं, सामुदायिक शेतीचाच आपल्याला अवलंब करावा लागेल. ”

मुंबई राज्याचे सहकार मंत्री श्री. बाळासाहेब भारदे यांनीं श्री. अप्पासाहेब पटवर्धनांच्या म्हणण्यावर आक्षेप घेतला. ते म्हणाले कीं, ग्रामदानाच्या मुळाशीं एकनाथांनीं म्हटल्याप्रमाणें, उजवे हातीचे पदार्था । डावे हातीं देतां । तेथें कोण देता कोण घेता । तेवीं एकात्मकता सर्वभूतीं ॥ असा जर भाव आहे तर मग जमीन सुधारली म्हणून एकाद्याला मोबदला किंवा सवलत देण्याचा विचार करणें चूक होईल. त्यामुळ पुन्हां व्यक्तिगत मालकीच्या भावनेला जागा करून दिल्यासारखें होणार आहे.

दिवसभराच्या चर्चेचा समारोप करीत असतांना श्री. अण्णासाहेब म्हणाले, “ ग्रामदानाची व्याख्या काय असावी यासंबंधीं नुकताच म्हैसूर येथें झालेल्या बैठकींत आम्ही विचार केला. गांवांतील ८० टक्के जमिनीच्या मालकांनीं दान केलें आणि तें गांवच्या एकूण जमिनीच्या ५० टक्के किंवा त्याहून अधिक होत असेल, तर त्याला ग्रामदान म्हणावें, असें आम्ही तात्पुरतें ठरविलें आहे. अखेरीस शेती सामुदायिक पद्धतीनेंच केली जाईल, याविषयीं माझ्या मनांत शंका नसली तरी आज तें शक्यहि नाहीं आणि इष्टहि नाहीं हें कम्युनिस्ट देशांतील अनुभव पहातां सर्वमान्य व्हावें. सामुदायिक शेतीसाठीं योग्य तें वातावरण आणि संघटन आधीं उभें करावें लागेल. ज्या योगें व्यक्तीचें स्वातंत्र्य आणि व्यक्तित्व यांवर बंधनें येणार नाहींत. आदिवासी भागांत किंवा रत्नागिरी सारख्या जिल्ह्यांतून धान्याच्या शेतींतून पुरेसें पिकणारच नाहीं. तेथें फळबागा किंवा कॉफीचे मळे, असलीं specialised पिकें घ्यावीं लागतील. जंगल वाढवून त्यांतून कच्चा माल काढावा लागेल. आपल्याला आपलें मन मोकळें ठेवलें पाहिजे. भावनियंत्रणाचें महत्त्व आम्हाला कळलेलें नाहीं असें नाहीं. स्वावलंबनाची भूमिकाच मुळीं भाववाढ आणि घट यांच्या दुष्ट चक्रांतून खेड्यांची सोडवणूक करणें ही आहे. शहरें आणि खेडीं यांच्यांत सर्व क्षेत्रांत जें एक अंतर निर्माण होत आहे तें कमी करण्याकरितां कांहीं उपाय-योजना करावी लागेल. आतापर्यंतच्या चर्चेवरून तुमच्या लक्षांत आलें असेल कीं, ग्रामीण जीवनांतले आजचे प्रश्न हे सहज सुटणारे नाहींत आणि कोणत्याहि पुस्तकांत किंवा तत्त्वज्ञानांत त्यांचीं उत्तरें लिहून ठेवलेलीं आयतीं आपल्याला मिळणार नाहींत. नवा मार्ग शोधून काढण्याचेंच काम आपल्याला करावें लागणार आहे. ”

प्रा. धनंजयराव गाडगीळांना कांहीं जरूरीचें काम असल्यानें ता. ९ च्या बैठकीचें अध्यक्षस्थान स्वीकारलें होतें. प्रथम कर्जाचा प्रश्न चर्चेला घेतला जाईल असें त्यांनीं सांगितलें. आपल्या प्रास्ताविक भाषणांत ते म्हणाले, “ आज शेती हा आंतबट्ट्याचा धंदा झाला आहे. कोऑपरेटिव्ह सोसायट्या आणि बँका त्यामुळें कर्ज देतांना सर्व नियम काटेकोरपणें पाळतात. त्यामुळें गरजू शेतकऱ्यांना कर्ज मिळत नाहीं, सधन शेतकऱ्यालाच तें मिळतें असा प्रत्यक्षांत अनुभव येतो. कर्जाची व्यवस्था करतांना शेती मालाच्या विक्रीचीहि व्यवस्था झाली पाहिजे. त्याशिवाय कर्जवसूलीचा प्रश्न सुटणार नाहीं. त्या क्षेत्रांतला बाजारहि आपल्याला नियंत्रित करतां आला पाहिजे. शेतीमालाला योग्य भाव मिळाले पाहिजेत. ”








सातारा जिल्ह्यांतील श्री. बोराटे यांनीं अशी सूचना केली कीं, शेतावरच धान्य विकत घेण्याची व्यवस्था झाली पाहिजे. शेतकऱ्याच्या खावटीकरतां आणि भांडवली खर्चाकरतां आवश्यक तें कर्ज त्याला उपलब्ध करून दिलें पाहिजे.

प्रा. काळे यांनीं बँकांनीं आपल्या कर्जाबद्दलच्या घोरणांत आवश्यक ते बदल करून शेतींत योग्य मालाचें उत्पादन वाढेल असेंच कर्ज द्यावें. व्यापारी कर्ज देऊं नये. तसेंच बँकांनीं भांडवल-संचयाचेंहि काम केलें पाहिजे.

जोपर्यंत अनियंत्रित खुल्या बाजाराची सद्दी चालू राहील तोपर्यंत क्रेडिट सोसायटया यशस्वी होतील कां असा प्रश्न श्री. रा. कृ. पाटीलांनीं उपस्थित केला. धान्याचीं गोदामें आणि कोठारें सर्व देशभर उघडलीं पाहिजेत आणि प्रत्यक्ष धान्यावर शेतकऱ्याला कर्ज मिळण्याची सोय झाली पाहिजे. धान्यव्यापारांतील दलालांची नफेबाजी नष्ट होईल याकरतां सरकारनें कडक घोरण स्वीकारलें पाहिजे. आजचें सरकारचें धोरण धरसोडीचें आहे. आम्ही विदर्भांत असा प्रयोग केला. सरळ शेतकऱ्यांकडून कापूस घेऊन तो अहमदाबादच्या मिल-मालकांना विकण्याचें आम्ही ठरविलें. पण मिलवाल्यांनीं आपण व्यापाऱ्यांकडूनच माल विकत घेऊं असें सांगितलें. व्यापारी-भांडवलदार वर्गाची ही मक्तेदारी आपल्याला मोडावी लागणार आहे. सहकारी चळवळ फोफावयाची असेल तर बाजारावर निर्बंध बसविले पाहिजेत.

जरूर पडल्यास ग्रामदानी गांवांतील लोकांनीं कांहीं वर्षें उपासमारी सहन करावी पण कर्जाच्या दुष्ट फेऱ्यांत आपली मान कायमची अडकवून घेऊं नये. आपल्याला आवश्यक तें कर्ज गांवच्या शिलकेंतून मिळेल अशी व्यवस्था करण्याचा निर्धार गांवकऱ्यांनीं करावा असें अप्पासाहेब पटवर्धनांनीं सांगितलें.

## स्वयंपूर्णतेची आवश्यकता

डॉ. ग्यानचंद यांनीं हाच विचार अर्थशास्त्रीय परिभाषेंत मांडला. ते म्हणाले, "आजच्या अर्थरचनेंत पैशाला जें कृत्रिम आणि अवास्तव महत्त्व प्राप्त झालें आहे तें कमी करून नफ्यावर आधारित उत्पादन व्यवस्थेऐवजीं समाजोपयोगाच्या मूल्यावर आधारलेलें उत्पादनतंत्र निर्माण केलें पाहिजे. म्हणजे बाजाराची जी जीवघेणी पकड ग्रामीण भागावर आहे ती सोडवून टाकतां येईल. या दृष्टीनें गांवच्या गरजा, गांवांतील साधनसंपत्ति आणि गांवांतलें मनुष्यबळ या तीन घटकांवर आधारलेली स्वयंपूर्ण अर्थरचना उभी करणें अतिशय महत्त्वाचें आहे. प्रत्येकाला बाहेरून कांहीं वस्तू आणाव्या लागतीलच. पण त्या आवश्यक तितक्याच व सर्वांनीं मिळून आणल्या तर शोषणाची शक्यता कमी होईल. गांवांतर्गत वस्तूंचे भाव ठरविण्याचा प्रश्न तितका अवघड जाणार नाहीं. गांवाला कर्ज आणि मदत दिल्यानें अनिर्बंध भाववाढ अवघड जाणार नाहीं. त्यासाठीं अर्थरचनेचा पायाच आपल्याला बदलावा लागेल. म्हणजे शेवटीं समाजमूल्येंच बदलावीं लागतील. बँकांचें राष्ट्रीयीकरण करणें आणि सगळा व्यापार सरकारी संघटनांमार्फत करणें या दोन गोष्टींची आवश्यकताहि मला वाटते. शेतीकरतां सुरुवातीला पुरेसें भांडवल उपलब्ध करून दिलें तरच इतर इतर गोष्टींचा उपयोग होईल हेंहि तितकेंच खरें."

चर्चेचा समारोप करतांना अण्णासाहेब म्हणाले कीं, शेवटीं कोणत्याहि प्रश्नाचें उत्तर काय असावें याची ग्रामदानांत एक अंतिम कसोटी मी मनाशीं ठरविलेली आहे. एकाद्या घरांत हा प्रश्न उभा राहिला असता तर त्यांनीं काय केलें असतें असें मी स्वतःला विचारतों. कारण शेवटीं सबंध गांव हें एक विशाल कुटुंब आहे हीच भावना ग्रामदानांत आपल्याला जोपासावयाची आहे.

## ग्रामदान व कायदा

दुपारीं ग्रामदानाला अनुकूल आणि आवश्यक असे कोणते फेरफार सध्यांच्या कायद्यांतून केले पाहिजेत यासंबंधीं श्री. रा. कृ. पाटील यांनीं आपले विचार मांडावेत अशी अण्णासाहेबांनीं त्यांना विनंति केली. त्यासंबंधींची प्रा. गाडगिळांची एक नोट प्रथम वाचण्यांत आली. श्री. पाटील यांनीं ग्रामदान हें कायद्यांत रीतसर नोंदलें जाण्याची आवश्यकता आहे असें प्रथमच सांगितलें. त्यामुळें गांवाला व्यापार, शेती कर्ज, इतर सरकारी मदत याबाबत सोईचें जाईल असें त्यांनीं सांगितलें. ग्रामदानाकरतां गांवाचें क्षेत्र रेव्हेन्यू गांवापेक्षां कमी असलें तरी चालेल. ज्यांनीं ग्रामदान केलें तीं कुटुंबें सलग वस्ती करून राहणारीं मात्र असावीत. जमीनमालक किंवा संरक्षित कूळ यापैकीं कोणालाहि जमीन देतां येईल.

ग्रामदान रजिस्टर करण्याची पद्धत काय असावी ? आम्हांला ग्रामदान करायचें आहे असें गांवानें नियुक्त बोर्डाला कळवावें. बोर्डानें त्याची चौकशी करावी. एक दिवस जाहीर करून त्या दिवशीं गांवांतील सर्व प्रौढांच्या सभेंत निर्णयावर 'शिक्कामोर्तब' व्हावें. गांवानें कामकाजासाठीं सर्वसंमतीनें एक संयोजक नेमावा. संयोजकाची नेमणूक झाली म्हणजे ग्रामदान झालें असें मानावें.

गांवांतील सोळा वर्षांहून वरच्या वयाच्या सर्व प्रौढांची ग्रामसभा राहील. ती कायमची संस्था मानली जाईल, ती रजिस्टर केली जाईल. तिचें स्वतंत्र सील असेल.

संयोजकाचें काम काय ? त्याची फेरनिवड कशी केली जाईल. त्यानें ग्रामसभेच्या बैठकी बोलवायच्या आणि सभांच्या कामकाजाचा अहवाल ठेवायचा. सर्व संमतीनेंच सर्व निर्णय झाले पाहिजेत. विशिष्ट बाबींत ग्रामसभेनें एकमतानें जर असें ठरविलें कीं, ८०% लोकांचा निर्णय पाळावा तर तसें करण्याचा अधिकार ग्रामसभेला असावा.

जमिनीचें केव्हांहि पुनर्वितरण करण्याचा ग्रामसभेला हक्क राहील. कुटुंबप्रमुख मेला म्हणजे ती जमीन ग्रामसभेकडे जाईल. सर्वसाधारणपणें त्याच्याच वारसाला ती परत दिली जाईल. ग्रामदानी गांवांतल्या सर्व उत्पन्नावर ग्रामसभेचा कायदेशीर हक्क राहील. गांवांत कोणाला किती कर्ज आहे त्याचा हिशेब ग्रामसभा ठेवील. त्याच्या परतफेडीची व्यवस्था करील. गांवच्या शिक्षणाची, आरोग्याची जबाबदारी ग्रामसभेची राहील. गांवांतले तंटे मिटविणें हेंहि तिच्याच अधिकारांतलें काम असेल. बहुसंख्य लोकांच्या इच्छेला खीळ बसूं नये पण एकावरहि कोणत्याहि प्रकारें सक्ती करणें अशक्य जाईल असेंच ग्रामदान-कायद्याचें स्वरूप राहील.

ग्रामसभेला न्यायदानाचा अधिकार असावा कीं नसावा यावर खूपच साधकबाधक चर्चा झाली. राष्ट्रद्रोह किंवा फौजदारी गुन्हे याबाबत ग्रामसभेला न्यायदानाचे अधिकार नसावेत असें सर्वसाधारणपणें ठरलें. याबाबत सर्व सेवासंघानें कायदेतज्ज्ञांशीं सल्लामसलत करावी असें सुचविलें गेलें.

## ग्रामदानी गांवांतील कारभार

यानंतर ग्रामदानी गांवांतील कारभाराची व्यवस्था कशी असावी याबाबत चर्चा झाली. श्री. शंकरराव देवांनीं विषयाचें प्रास्ताविक विवेचन केलें. ते म्हणाले, "परवां म्हैसूरला झालेल्या चर्चेच्या वेळीं आमचीं मनें प्रचलित कायदेकानूच्या जंजाळांत किती फसलेलीं आहेत तें पहायला मिळालें. गेल्या दीड दिवसांत इथें जी चर्चा झाली तीहि मी काळजीपूर्वक ऐकली. मला असें वाटतें कीं, ग्रामदानामागील आध्यात्मिक भूमिकेकडे कांहींसें दुर्लक्षच झालें आहे. ग्रामदानाचा तो प्राण आहे. ग्रामदानांतून जनशक्तीवर आधारित अहिंसक सर्वोदयी समाजरचना निर्माण करणें हें आपलें उद्दिष्ट आहे. जीवनमान वाढविण्याचा प्रश्न महत्त्वाचा आहे, पण तें साध्य सिद्ध करण्याचें आमचें जें साधन, जी प्रक्रिया ती त्याहून महत्त्वाची आहे-








म्हणून आजच्या कायद्यांत काय बदल करावेत, ग्रामदान हें कायद्यांत कसें बसेल, सरकारी मदत मिळण्याकरतां आम्ही स्वतःला कसें adjust करावें ह्या विचाराचा दृष्टिकोण सर्वोदयाचा दृष्टिकोण नाहीं. ग्रामसंकल्पांतून, गांवच्या कुवतीनुसार, विचारानुसारच क्रांति होणार आहे. गांवांतील कामें कोणी एक कमिटी करील, कोणी कार्यकर्ते तिचें नेतृत्व करतील असा विचार करणें चूक ठरेल. जबाबदारी आणि अधिकार कांहीं प्रतिनिधींवर निवडणूक द्वारां सोपविले म्हणजे आपण आपलें कर्तव्य केलें ही लोकांची समजूत काढून टाकली पाहिजे. प्रत्येकानें प्रत्येक निर्णयांत क्रियात्मक भाग घेतला पाहिजे. ही नवीन कार्यपद्धति आणि विचार रुजविण्याचें एकमेव म्हणजे नई तालीम. शिक्षणाद्वारें लोकांच्या जीवनमूल्यांत परिवर्तन घडवून आणावयाचें आहे. भूदान कार्यकर्त्यानें आपली भूमिका शिक्षकाची आहे हें विसरतां कामां नये. गांवांत एक सर्व प्रकारच्या कामाकरितां वर्षांच्या मुदतीची प्रबंध समिति नसावी. प्रत्येक कामाकरतां त्या कामापुरतीच एक समिति ग्रामसभेनें नेमावी. गांवचा कारभार ही एक सत्याग्रही शिक्षण शाळाच बनली पाहिजे.”

अण्णासाहेबांनीं कोरापुटमधल्या आपल्या अडचणी सांगितल्या. ‘ग्रामदान झाल्यानंतरहि जुन्याच सधन, वडीलधाऱ्या आणि उच्च जातीच्या पुढाऱ्यांकडेच नेतृत्व राहतें. ग्रामदान झालें तरी त्यांचा स्वभाव कायम राहतो. त्या जागीं तरुण, निःस्वार्थी, धडाडीचें नेतृत्व कसें निर्माण होईल ? आज जीं अनेक धरणाचीं, ताली बांधण्याचीं, सहकारी दुकानाचीं व अन्य कामें आम्ही सुरूं केलीं आहेत त्या कामांत आपल्या कौशल्यानें, कर्तबगारीनें, हुषारीनें कांहीं तरुण पुढें येत आहेत. ते पुढें गांवाचें नेतृत्व करतील अशी आशा आम्हांला वाटते.

“ग्रामदान झाल्यानंतरहि आजच्या सरकारी ग्राम पंचायती राहणार आहेत. प्रथम आम्ही असें ठरविलें कीं, ग्रामपंचायतीच्या निवडणुका आपण लढवूं नयेत. पण ग्रामपंचायतीच्या हातीं अनेक गोष्टी असतात आणि जुनेच लोक तेथें निवडून गेल्यानें सत्तेच राजकारण चालूं राहातें व त्याचा गांवांतील वातावरणावर अनिष्ट परिणाम होतो, असें आमच्या अनुभवास आलें. म्हणून आतां आम्ही ग्रामपंचायतीच्या निवडणुकांत भाग घेऊन त्या संस्थांमधलें वातावरण बदलण्याचा प्रयत्न करण्याचें ठरविलें आहे.

“ग्रामदानी गांवांचा आणि सरकारचा काय संबंध असावा ? आमच्या क्षेत्रांतलीं ५०० ग्रामदानीं गांवें ग्रामविकास योजना आणि राष्ट्रीय विस्तार योजनांच्या कक्षेंत येतात. त्यांच्याशीं सहकार्य करावें कां ? आपलीं उद्दिष्टें आणि सरकारी योजना आणि सर्वोदय विचार यांच्यांतील मतभेद व सहकार्याची मर्यादा याबाबत आमचें मन साफ असलें तर सहकार्यांतून आम्ही त्याच्या चाकोरींत सापडूं अशी भीति बाळगण्याचें कारण नाहीं. कोरापुटमध्यें ग्रामनिर्माणाचें जेवढें काम सरकार उचलायला तयार असेल तेवढें त्यांच्यावर सोपवावें व कांहीं केंद्रेंच फक्त आपण प्रयोगशाळांच्या स्वरूपांत चालवावींत असा आमचा विचार चालू आहे.

“शेतकी कर्जाबाबत आणि खरेदी-विक्री व्यवस्थेबाबतहि प्रत्येक गांवानें बाहेरच्या खुल्या बाजारांत झगडणें यांत शक्तीचा अपव्यय होऊन अपयश पदरांत पडेल असें आम्हाला वाटतें. सर्व ग्रामदानी गांवांची एक केंद्रीय कोऑपरेटिव्ह संघटना निर्माण करून त्यामार्फत हे व्यवहार केले तर बाजारांत आम्ही आपला प्रभाव पाडूं शकूं. कर्जहि मिळणें सोईचें जाईल.

“शेवटीं आपण हें विसरतां कामां नये कीं, आज कोठेंहि जाऊन आमच्या पद्धतीनें काम करायचें ठरविलें तरी सरकारशीं, इतर संस्थांशीं आपला संबंध येणारच आहे. त्यांचें कार्य आणि अस्तित्व



अनुक्रमणिका







नाकारणें आंधळेपणाचें होईल. तसेंच आमची स्वतः-ची अशी एक कडवी पोटजात आम्ही बनवितां कामा नये. सर्वांशीं तत्त्व न सोडतां सहकार्य करीत राहून इतरांचें विचारपरिवर्तन घडवून आणणें हें आमचें ध्येय असलें पाहिजे."

ज्या सरकारचें धोरण केंद्रीकरणाचें आहे, ज्या-मुळें विषमता पसरत आहे त्या सरकारशीं सहकार्य कसें शक्य आहे व तसें करणें हें विसंगत होईल असा विचार श्री. नातू यांनीं मांडला. सरकारच्या शेती उत्पादनवाढीच्या ज्या अनेक योजना आहेत त्या बहुतेक अत्यावश्यक अशाच आहेत असें स्पष्टी-करण करून श्री. अच्युतराव पटवर्धन म्हणाले कीं, आज सरकारी योजनामुळें शहरें आणि खेडीं यांच्या विकासांत झपाट्यानें एक दरी निर्माण होत आहे. हें घातक आहे. ग्रामीण विकास झपाट्यानें होईल, तो करण्यांत सर्वांनीं हातभार लावला पाहिजे.

श्री. प्राणलाल कापडीया यांनीं ग्रामदानी गांवां-च्या विकासांत ग्रामोद्योगांचें स्थान महत्त्वाचें आहे. याची जाणीव करून दिली. खादी ग्रामोद्योग कमि-शनच्या कामाचा परिचयहि करून दिला.

मुंबई राज्यांतील डेप्युटी डायरेक्टर ऑफ एज्यु-केशन श्री. चिकरमाने यांनीं ग्रामदानी गांवांतील शिक्षणासंबंधी एक प्रबंध वाचला. नई तालीमच्या प्रयोगाकरतां ग्रामदानी गांव ही उत्कृष्ट संधि आहे आणि नवसमाजनिर्मितींत नई तालीम महत्त्वाचें कार्य करूं शकेल असें सांगितलें.

श्री. नारायण देसाई यांनीं या विचाराचा पुरस्कार केला. ते म्हणाले कीं, नवसमाजनिर्मिति हाच ग्राम-दानी गांवांतील शाळेचा अभ्यासक्रम राहील आणि लहानमोठे सर्वच त्याद्वारें आपला विकास करून घेतील. ग्रामसंकल्पाचें सामर्थ्य फार मोठें आहे आणि त्याचा आविष्कार पूर्णपणें झाला पाहिजे.

श्री. गोविंदराव देशपांडे यांनीं सर्वांचे आभार मानल्यावर परिसंवादाचें सूप वाजलें.

---

## साभार पोंच

**आजकालचा भारत :** ले. रमेश थापर अनु. श्री. रा. टिकेकर; प्रका. के. मि. ढवळ, मुंबई २. किंमत ५.७५ रु.

**अगदीं मनासारखं ( As You Like it )** श्री. द. के. भट, प्रका. के. भि. ढवळे, मुंबई २, किंमत ५२ नये पैसे.

**स्वप्न भंग ( काव्यसंग्रह ) :** प्रभाकर माचवे, प्रका. साहित्य भवन, इलाहाबाद. मूल्य. २ रु.

**इतिहासाचा अंतःप्रवाह :** ले. द. वि. केतकर, अनाथ विद्यार्थी गृह प्रकाशन, १९५७; पृष्ठें ११४, किं. २ रु.

---

श्री. श्री. शं. नवरे

# साहित्यसंस्थांचें 'एकीकरण'

गेल्या मे महिन्यांत औरंगाबाद येथें भरलेल्या मराठी साहित्य संमेलनांत पुढील महत्त्वाचा ठराव सर्वानुमतें संमत करण्यांत आला —

" महाराष्ट्रांत अनेक संस्था मराठी साहित्याच्या अभिवृद्धीसाठीं प्रयत्न करीत आलेल्या आहेत. त्या सर्वांचें संघीकरण ( फेडरेशन ) करणें साहित्यविषयक विविध चळवळींना पोषक ठरणार आहे. हें ध्येय लक्ष्यांत घेऊन घटक संस्थांची स्वायत्तता कायम ठेवून व त्यांच्या प्रतिनिधींची मध्यवर्ती संस्था निर्माण करून या संघीकरणाला स्वरूप देतां येण्यासारखें आहे. तरी या दिशेनें प्रयत्न करून निश्चित योजना आंखण्यासाठीं हें संमेलन महाराष्ट्र साहित्य परिषद्, विदर्भ साहित्य संघ, मराठवाडा साहित्य परिषद् व मुंबई मराठी साहित्य संघ या संस्थांचे प्रत्येकीं दोन प्रतिनिधी यांची एक समिति नेमीत आहे. या समितीनें चार महिन्यांचे आंत आपला अहवाल महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या कार्यकारी मंडळाला सादर करावा. कार्यकारी मंडळानें तो लोकमत अजमावण्यासाठीं प्रसिद्ध करावा व पुढील साहित्य संमेलनापुढें ठेवावा.

महाराष्ट्र साहित्य परिषदेचे अध्यक्ष (प्रा. अनंत काणेकर) हेच वरील समितीचे अध्यक्ष रहातील. "

## म० सा० संमेलन व परिषद

मराठी साहित्यसंस्थांच्या एकीकरणाची कल्पना आज अनेक वर्षें कांहीं साहित्यिकांच्या डोक्यामध्यें घोळत असून प्रसंगोपात्त त्यांनीं ती बोलूनहि दाखविली आहे. महाराष्ट्र साहित्य संमेलनाची स्थापना १८७८ सालीं व महाराष्ट्र साहित्य परिषदेची स्थापना १९०६ सालीं गृहीत धरण्यांत येते. परिषद् ही घटनाबद्ध स्थायी संस्था आणि संमेलन हें सोयीप्रमाणें आमंत्रण येईल त्याप्रमाणें कोठेंतरी भरणारें. परिषद् आणि संमेलन यांचे परस्पर संबंध काय असावे हा पुष्कळ दिवस वादाचा मोठा विषय होऊन बसलेला होता. त्यांची सांगड घालण्यांत पुष्कळ श्रम आणि काल हीं खर्चीं पडलेलीं आहेत. पण येथें त्याचा विचार कर्तव्य नाहीं. केवळ महाराष्ट्रांतच नव्हे तर भारतांत आणि जगांत मराठी भाषा जेथें जेथें बोलली जाते तें महाराष्ट्र साहित्य परिषदेचें क्षेत्र. पण हें व्यापक क्षेत्र घटनेच्या दृष्टीनें केवळ नांवाला. परिषदेचें कार्यालय जितकें जवळ तितकी परिषदेचा लाभ घेण्याची सोय अधिक, आणि कार्यालय जितकें दूर तितका परिषदेशीं नित्य संबंध ठेवण्यांत अडचण अधिक. मराठी भाषा बोलणारे सलग प्रदेशांतील लोक राज्यकारभाराच्या दृष्टीनें अनेक प्रांतांत विभागले गेल्यामुळें या अडचणींत आणखी भर पडली. सर्व सरकारांचीं भाषाविषयक धोरणें सारखीं नव्हतीं. निजामी हैद्राबाद संस्थानांत तर मराठीचें नांव घेण्याची चोरी. राज्यकारभाराच्या प्रांतांप्रमाणें मराठी भाषिक लोक निरनिराळ्या विद्यापीठांच्या अधिराज्याखालीं विभागले गेलेले. स्थानिक परिस्थितिप्रमाणें निरनिराळ्या प्रदेशांत भाषाविषयक निरनिराळे प्रश्न उत्पन्न होत गेले. स्थानिक भूमिकेवरून त्यांचा परामर्श घेणें अधिक शक्य होतें. विस्तृत प्रदेशांतील साहित्यिकांना विचार-विनिमयासाठीं वारंवार एकत्र जमणें अनेक कारणांमुळें अशक्य होऊन बसतें. अशा विविध कारणांनीं मध्यवर्ती महाराष्ट्र साहित्य परिषद् अस्तित्वांत असूनहि ठिकठिकाणीं साहित्यसंस्था उदयाला आल्या, इतकेंच नव्हे तर थोड्याच अवधींत त्या सुप्रतिष्ठित होऊन आपल्या विस्तारानें मध्यवर्ती संस्थेवर सावट पाडूं लागल्या. त्यांत सकारण किंवा अकारण गैरसमजांची आणखी भर पडत जाऊन परस्परांविषयींचा दुजेपणा वाढत चालला.

## प्रथम अनौपचारिक चर्चा

साहित्य संस्थांचे ठिकठिकाणीं स्वतंत्र सुभे स्थापन होण्यांत जसे कांहीं फायदे होते तसे तोटेहि दिसूं लागले. जिला मराठी भाषिकांची प्रतिनिधि म्हणतां येईल, अशी संस्था कोणती असा प्रश्न उत्पन्न झाला. समान हिताच्या प्रश्नांचा समान भूमिकेवरून



अनुक्रमणिका






एकच विचार करणें कठीण जाऊं लागलें. एकच कार्य अनेक ठिकाणीं केल्यानें श्रम आणि द्रव्य वाजवीहून अधिक खर्ची पडतात. सर्वांच्या सहकार्यानें एकेच ठिकाणीं तें केल्यास दोहोंत बचत होते. तेव्हां विभक्तीकरणाचे फायदे कायम ठेऊन तोटे नाहींसे करण्याचे हेतूनें काय करतां येईल याचा विचार सुरू झाला. १९५० सालीं मुंबईस भरलेल्या साहित्य संमेलनाला महाराष्ट्राच्या सर्व भागांतून मोठ्या संख्येनें प्रतिनिधी आलेले होते. त्या संधीचा फायदा घेऊन केवळ याच कारणासाठीं बोलावण्यांत आलेल्या एका खाजगी निमंत्रितांच्या सभेंत या विषयाची प्रथम अनौपचारिक चर्चा करण्यांत आली. या प्राथमिक सभेंत केवळ विचारविनिमया पलीकडे निर्णयाचे दृष्टीनें कांहीं झालें नाहीं आणि अत्यंत मर्यादित वेळेंत आणि पूर्वसूचनेवाचून एकदम कोणताहि निर्णय घेणें शक्यहि नव्हतें.

## कारवार संमेलनांतील ठराव

पण पुढील वर्षी कारवारच्या संमेलनांत मात्र या विषयावर एक ठराव पास करून पुढचें पाऊल टाकण्यांत आलें. हा ठराव असा—

" अखिल महाराष्ट्रांत अनेक संस्था मराठी साहित्याच्या अभिवृद्धीसाठीं प्रयत्न करीत आहेत. त्या सर्वांचें दृढीकरण व एकसूत्रीकरण अत्यंत आवश्यक असल्यामुळें घटनात्मक व इतर आनुषंगिक सर्व प्रश्नोपप्रश्नांचा संपूर्ण विचार वरील संस्थांच्या सहकार्यानें करून समुचित योजना सहा महिन्यांच्या आंत तयार करण्याचा आदेश हें संमेलन महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या कार्यकारी मंडळाला देत आहे. "

हा ठराव अध्यक्षांकडून मांडण्यांत आल्यामुळें त्यावर भाषणें किंवा चर्चा झाली नाहीं. संमेलनानें दिलेल्या आदेशाप्रमाणें म. सा. परिषदेच्या कार्यकारी मंडळानें हालचाल सुरू करून प्रमुख साहित्य संस्थांचे या विषयावर अभिप्राय मागविले. पण त्या अभिप्रायांचा समन्वय करून एकीकरणाची योजना कार्यवाहींत आणणें तूर्त तरी अशक्य आहे असें अनुभवाला आलें. याच वेळीं भाषावार प्रांतरचनेची चळवळ निकराला येऊन संयुक्त महाराष्ट्राची मागणी राजकीय व्यासपीठांप्रमाणें साहित्य संमेलनाच्या व्यासपीठावरून जोरानें मांडण्यांत येऊं लागली. या चळवळीचा परिणाम म्हणून सर्व सलग मराठी प्रदेश एकाच राज्यांत आल्यास साहित्य संस्थांच्या एकीकरणाचें कार्य अधिक सुलभ होईल असें वाटलें. आणि हा अंदाज सुदैवानें खरा ठरला. मुंबईसह संयुक्त महाराष्ट्र झाला नाहीं, पण द्वैभाषिकांत बहुतेक सलग मराठी प्रदेश एकत्र आला. यामुळें साहित्य संस्थांच्या एकीकरणाला नवी चालना मिळाली आणि औरंगाबादचें अधिवेशन भरण्यापूर्वीच या प्रश्नाची सर्वत्र जाहीर चर्चा होऊं लागली. औरंगाबाद संमेलनाचे अध्यक्ष प्रा० काणेकर यांनीं आपल्या भाषणांत या विषयाचा उपन्यास करून एकीकरणाची आवश्यकता प्रतिपादन केली. यानंतर संमेलनांत संमत झालेल्या ठरावाचा निर्देश वर प्रारंभीं केलाच आहे.

## औरंगाबादच्या ठरावाचें स्वरूप

औरंगाबादच्या ठरावांत कांहीं मुद्यांवर निश्चित मार्गदर्शन करण्यांत आलेलें आहे हें तो ठराव वाचतांच ध्यानांत येतें. एकीकरण संघीकरणाच्या स्वरूपांचें असावें असें सांगण्यांत आलें. संघीकरण हा शब्द विशिष्ट अर्थानें भाषेंत अद्यापि रूढ झालेला नसल्यामुळें ' फेडरेशन ' या रूढ इंग्रजी शब्दाची स्पष्टीकरणासाठीं त्याला जोड देण्यांत आली. स्वायत्त घटकांनीं समान हितासाठीं एकत्र येण्यानें फेडरेशनची निर्मिती होते. तथापि त्यांतहि पुनः शंकेला जागा राहूं नये म्हणून ' घटक संस्थांची स्वायत्तता कायम ठेवून ' ही शब्दयोजना ठरावांत घातलेली आहे. तसेंच डोळ्यांसमोर दिसणाऱ्या घटक संस्थांचा निर्देशहि ठरावांतच करण्यांत आला पण त्यांत एक गोम आहे. तिच्यामुळें नंतर थोडाबहुत वाद झालाहि. महाराष्ट्र साहित्य परिषदेचें क्षेत्र अत्यंत व्यापक म्हणजे विदर्भ साहित्य संघ, मराठवाडा साहित्य परिषद् व मुंबई मराठी साहित्य संघ, या बाकीच्या तीन संस्थांच्या क्षेत्रांना व्यापून ' दशांगुळें ' शिल्लक उरणारें आहे. पण तिला ज्याअर्थी या तीन संस्थांच्या पंक्तीला बसविण्यांत आलेलें आहे त्याअर्थी तिचें क्षेत्र बाकीच्या तीन संस्थांचीं क्षेत्रें वगळून फक्त पश्चिम महाराष्ट्रापुरतें गृहीत धरण्यांत आलेलें आहे अशी शंका कांहीं लोकांनीं काढली. पण महाराष्ट्र साहित्य परिषदेचें सर्वव्यापी क्षेत्र तिच्या घटनेंतच नमूद झालेलें असल्यामुळें अशा शंकेला अर्थातच वाव नव्हता. नवें फेडरेशन तयार करतांना घटक संस्थांबरोबर महाराष्ट्र साहित्य परिषद् या








विद्यमान मध्यवर्ती संस्थेचाहि विचार घेण्यांत यावा, या पलीकडे ठरावांत दुसरा कोणताहि ध्वनि अभिप्रेत नाहीं, हें जाणकारांस चांगलें माहीत आहे.

ठरावांत नमूद केलेल्या चार प्रमुख साहित्य संस्थांखेरीज आणखी किती तरी संस्था बेळगांव, बडोदें इंदूर, ग्वाल्हेर, दिल्ली, अहमदाबाद इत्यादि विखुरलेल्या भागांत साहित्य सेवेचें कार्य मर्यादित क्षेत्रांत आपापल्या मगदुराप्रमाणें करीत आहेत. त्यांचें काय करावयाचें हा प्रश्न औरंगाबादचा ठराव करणाऱ्यांच्या मनाला चाटून गेल्यावांचून राहिला नाहीं. पण त्या सर्वांचा ठरावांत निर्देश करणें अशक्य असल्यामुळें ठरावानें नेमलेल्या समितीनें 'फेडरेशन'ची योजना आंखतांना त्यांना प्रतिनिधित्व देण्याची सोय करावी, असें सांगून या शंकेचें निवारण करण्यांत आलें आणि त्या त्या भागांतून आलेल्या लोकांचें यामुळें समाधान झाल्यासारखें दिसलें.

## मुंबईच्या बैठकींतील निर्णय

औरंगाबादला नेमलेल्या समितीची बैठक ता. २२ सप्टेंबर रोजीं मुंबईंत होऊन एकाच सभेंत तिनें आपलें काम एकमतानें उरकून टाकलें ही गोष्ट भावी यशाचे दृष्टीनें अभिनंदनीय समजली पाहिजे. संकल्पित सांघिक साहित्य संस्थेंत विदर्भ साहित्य संघ, मराठवाडा साहित्य परिषद् व मुंबई मराठी साहित्य संघ या विद्यमान संस्थांना घटक म्हणून मान्यता देण्यांत यावी असें अर्थातच ठरविण्यांत आलें. विद्यमान मुंबई राज्यांतील उर्वरित (ज्याला पश्चिम महाराष्ट्र असें म्हणतां येईल) सलग मराठी प्रदेशाकरितां स्वतंत्र साहित्य संस्था सध्यां अस्तित्वांत नाहीं, कारण महाराष्ट्र साहित्य परिषदेचें कार्यालय त्या प्रदेशाला निकट असल्यामुळें आणखी निराळी संस्था काढण्याची आवश्यकता त्याला आजपर्यंत भासली नाहीं. पण फेडरेशनची कल्पना एकदां मान्य केल्यावर विद्यमान महाराष्ट्र साहित्य परिषदेचें स्वरूप अमूलाग्र बदलणार व म्हणून उर्वरित भागासाठीं एक निराळी साहित्य संस्था निर्माण करावी लागणार हें ओघानेंच आलें. हें काम अर्थातच त्या त्या प्रदेशांतील लोकांनीं करावयाचें आहे. तथापि तो संभाव्य घटक भावी फेडरेशनमध्यें गृहीत धरलेला आहे. या चार घटक संस्थांचा प्रदेश वगळून देशांतील व परदेशांतील साहित्यविषयक कार्य करणाऱ्या मराठी संस्थांचा एक घटक कल्पून त्याला प्रतिनिधित्व देण्याची शिफारस करण्यांत आली. प्रत्येक घटकानें निवडून दिलेले तीन प्रतिनिधी व या बारा प्रतिनिधींनीं इतर विस्तृत भागांतील संलग्न संस्थांचे मिळून स्वीकृत करून घेतलेले तीन प्रतिनिधी अशा एकंदर पंधरा सदस्यांकडे मध्यवर्ती सांघिक संस्थेची व्यवस्था राहील. या मध्यवर्ती संस्थेला 'मराठी साहित्य परिषद्' अशा नांवानें संबोधण्यांत येईल. महाराष्ट्र साहित्य परिषद् व महाराष्ट्र साहित्य संमेलन, हीं आतांपर्यंत रूढ असलेलीं प्रदेशवाचक नांवें बदलून त्या जागीं 'मराठी' हें भाषावाचक नांव ठेवण्याचा निर्णय अत्यंत महत्त्वाचा समजला पाहिजे. पैकी संमेलनाचें नामांतर दिल्ली अधिवेशनानंतर स्वीकारण्यांत आलें. फेडरेशन झाल्यावर आतां परिषदेचेंहि भाषावाचक नामांतर होणार आहे. इतर प्रांतांत वंग, तेलुगु, तामिळ, कन्नड, हिंदी, उर्दु, या भाषावाचक नांवांनीं साहित्य संमेलनें पूर्वीपासूनच अस्तित्वांत आहेत. आतां महाराष्ट्रांतील साहित्यिकहि त्यांचें अनुकरण करीत आहेत.

फेडरल संस्थेंतील घटक संस्थांची स्वायत्तता अर्थातच मान्य करण्यांत आलेली आहे. अधिकारक्षेत्राची विभागणी करतांना सर्वसामान्य भाषिक नीति ठरविणें, सर्व शासनसंस्थांशीं, आंतरराष्ट्रीय, आंतरराज्यीय व भिन्न-भाषिक संस्थांशीं व क्षेत्रांत अवश्य तेव्हां व्यवहार करून भाषिक व सांस्कृतिक बाबींत सर्व मराठी भाषिकांचें सर्वतोपरी प्रतिनिधित्व करण्याचा अधिकार फेडरेशनकडे सोंपविण्यांत आलेला आहे. मध्यवर्ती संस्थेच्या आर्थिक योगक्षेमाची सोय घटक संस्थांनीं पहावी, एवढेंच सांगून समितीनें तपशिलांत शिरण्याचें टाळलें आहे. तसेंच एकदां फेडरेशनमध्यें शिरल्यावर त्यांतून बाहेर पडण्याचा मार्ग घटकांना मोकळा राहील कीं नाहीं याचा स्पष्ट उल्लेख समितीच्या शिफारसींत नाहीं. पण समानहितासाठीं फेडरेशनची कल्पना एकदां मान्य केल्यावर तें फेडरेशन चालूं राहील अशी व्यवस्था करण्याची सर्व जबाबदारी घटकांवर येऊन पडते हें निराळें सांगण्याची जरूरी राहात नाहीं.

वरच्या पैकीं कांहीं घटकसंस्थांचीं मुखपत्रें सध्यां चालूं आहेत. तसेंच साहित्यविषयक परीक्षा घेण्याची












प्रथा कोठें स्वतंत्र तर कोठें महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या नियंत्रणाखालीं घेण्याची प्रथा सध्यां रूढ असून तें उत्पन्नाचें एक मोठें साधन होऊन बसलें आहे. निर-निराळीं मुखपत्रें न चालवितां फेडरेशनचें एकच मुखपत्र चालविलें तर तें आर्थिकदृष्ट्या अधिक सोयीचें होणार नाहीं काय ? तसेंच परीक्षांमध्यें एकसूत्रीपणा आणून त्यांचा दर्जा समान ठेवण्याचे दृष्टीनें फेडरेशननें परीक्षेची सर्व जबाबदारी घेणें अधिक व्यवहार्य व फेडरेशनच्या योगक्षेमाचे दृष्टीनें अधिक सोयीचें होणार नाहीं काय ? या दोन्ही प्रश्नांचा समितींत विचार झाला असें कळतें. पण त्याबाबतींत कांहीं निणय मात्र घेण्यांत आला नाहीं. अर्थात फेडरेशन अस्तित्वांत आल्यावर या गोष्टींचा पुनः विचार होण्याची शक्यता आहे.

समितीनें आपला रिपोर्ट महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या कार्यकारी मंडळाला ठरलेल्या मुदतींत सादर केला असून लोकमत अजमावण्यासाठीं तो प्रसिद्धहि झालेला आहे. दरम्यानच्या काळांत या रिपोर्टला अनुसरून महाराष्ट्र साहित्य परिषदेनें आपली घटना बदलून घ्यावयाची आहे. या बाबतींत परिषदेला यश आलें तर घटक संस्थांची त्याला संमति मिळवावी लागेल. तेंहि काम निर्विघ्नपणें पार पडलें तर मराठी साहित्य संस्थांचा संघ झालेला पहाण्याचें स्वप्न सत्य सृष्टींत उतरलेलें दिसेल.

—





अनुक्रमणिका

## पुस्तक-परामर्श

**शिरवा** ले. शांताराम; मौज प्रकाशन; मुंबई ४. १९५७, पृ. १६३ किं. ३॥· रु०

गेल्या दशकांत मराठी लघुकथेच्या स्वरूपांत फार मोठें स्थित्यंतर घडून आलें आहे. कथा-वाङ्मयांत निर्माण झालेल्या संकेतांच्या चाकोऱ्या ओलांडून कथेंत नवजीवन ओतण्याचा फार मोठा प्रयत्न केला गेला. या उलाढालींत कथावस्तु, कथाबांधणी, आणि आविष्कार पद्धति या सर्व घटकांना क्रांतीच्या अवस्थेंतून जावें लागलें. मनाचें सूक्ष्म आंदोलन कथावस्तु होऊं लागलें. एखाद्या चित्तवृत्तीचें चित्रण केलें तरी ती भावकथा म्हणून मानली जाऊं लागली. उत्कटता हा एकच निकष डोळ्यांपुढें ठेऊन बांधणीचा स्थूल सांचा नाहींसा करण्यांत आला. आविष्कार पद्धतिहि वेगवेगळ्या वळणांतून गेली. या स्थित्यंतराच्या कालखंडांत ज्या अनेक लेखकांनीं कथा लिहिल्या त्यांतले श्री. शांताराम हे एक 'शिरवा' हा त्यांच्या, १९४५ ते १९५४ या कालखंडांत प्रसिद्ध झालेल्या कथांचा संग्रह. या संग्रहांतील कथा मराठी कथेंतील स्थित्यंतराचें स्वरूप दर्शवतीलच परंतु श्री. शांताराम यांच्या कथासृष्टींतील विकासाचीहि कल्पना देतील.

उत्कट समर प्रसंग असावेत, रेखीव व्यक्ती असाव्यात आणि यांच्या संयोजनांतून निर्माण होणारी कथावस्तु विशिष्ट चढ-उताराच्या पद्धतीनें मांडावी या प्रकारांशीं श्री. शांताराम यांच्या कथा फटकूनच वागलेल्या दिसतात. मानवी मनाच्या सूक्ष्म आंदोलनांतून, संघर्षांतून त्यांचीं कथाबीजें अंकुरलेलीं दिसतात; व त्यांच्या आविष्करणांत भावचित्रणालाच प्राधान्य दिलेलें दिसतें. असें असलें तरी १९४५ ते १९५२, या काळांत लिहिल्या गेलेल्या प्रत्यय, नीति, श्वान लागे पाठीं, नशा या कथा केवळ मनोविश्लेषण वा भावचित्रण यांपेक्षां व्यक्ति आणि प्रसंग यांच्यावर अधिक अवलंबून आहेत. या कथांत कथावस्तूच्या रेखा, वळणें आपणांस स्पष्टपणें दिसूं शकतात. नंतरच्या कालांतील, 'अनर्थ', 'शिरवा', 'खार', 'वाढवेळ'; थोड्या अंशीं 'वळण' व 'जुळवणी' या कथांत त्या रेषा भावाविष्करणांत पूर्णपणें मिसळून गेलेल्या दिसतात. अर्थात् शांताराम यांच्या संग्रहित वा असंग्रहित अशा सर्वच कथांना हें भेद-लक्षण नियमासारखें लावतां येणार नाहीं किंवा या संग्रहाचें वरीलप्रमाणें सांचेबंद वर्गीकरण करावयाचें आहे असेंहि नाहीं. परंतु लेखकाच्या कथा बघण्याच्या आणि ती मांडण्याच्या दृष्टींतील सूक्ष्म फरक वरील उल्लेखांतून कळण्यासारखा आहे.

मनाच्या आंदोलनांतून कथा आकारत असल्यामुळें त्या आंदोलनांशीं संबंधित असलेल्या सूक्ष्म प्रेरणा, छोटाले प्रसंग, कांहीं व्यक्ति आणि विशिष्ट काळवेळ यांचा एक रांधा होऊनच कथा निर्माण होते. या साऱ्या घटकांतून फुलून येणारी चित्तवृत्ति तीच कथा-सौंदर्याचें प्रमुख अंग बनून राहते. या कारणामुळेंच श्री. शांताराम यांच्या कथांत आलेल्या अनेक व्यक्ति ठळक स्वरूप धारण न करतां व आपल्या नांवाचा फारसा डंका न करतां त्या चित्तवृत्तीला आधारभूत अशा रेखाकृतीसारख्या राहतात. अनर्थमधला 'तो', जुळवणीमधल्या 'तो-ती', खारमधल्या 'मी आणि ती', कंटाळामधली 'मी', वाढवेळमधला 'आत्माराम', (शिरवामधले रामचंद्रपंत सुद्धां) या साऱ्या व्यक्ति याच प्रकारच्या. व्यक्तींना व्यक्तिरेखा म्हणून नाममात्रच महत्त्व. सूक्ष्म भावांचें चित्रण करणें व चित्तवृत्ति रेखदार करून तिचें आविष्करण करणें यालाच प्राधान्य दिलेलें दिसतें. या कारणानेंच कीं काय शांताराम यांच्या कथांतील व्यक्तींच्या चेहेऱ्यामोहोऱ्याची वाचकास कल्पना येणार नाहीं. शिरवा मधले रामचंद्रपंत कसे होते, वाढवेळमधली आत्माराम ही व्यक्ति नक्की कशी होती, किंवा प्रत्ययमधल्या गजाननरावांचा पोषाख कसा होता याची वाचकास कल्पना येणार नाहीं. आणि ती येण्याचें कारणहि नाहीं. कारण व्यक्तिदर्शन स्वयंभू वा प्रातिनिधिक करणें हें लेखकाच्या कलाहेतूंतच नाहीं. म्हणूनच व्यक्तीच्या नांवानें यांतली कथा ओळखली जाणार नाहीं. एखाद्या आगळ्या व्यक्तित्वाचा नमुना म्हणूनहि कथा लक्षांत राहणार नाहीं. असें असलें तरी नशा मधलीं अनेक माणसें, श्वान लागे पाठीं मधली लीला-कर्णिक, वळणमधली शामा, धूळमधली ढेला, स्वभाव-मधल्या मिस जोन्स अशा कांही व्यक्ति स्वतःच्या वेगळेपणाचे ठसे मनावर ठेवून जातात. पण फार सूक्ष्म नाहीं म्हणायला 'वळण' मधली 'शामा' मात्र मनावर फार रेखीवपणें विंबून राहते. तिच्या नाजूक, निरागस भावनांचीं वळणें कौशल्यानें टिपलीं आहेत. पति-पत्नी आणि शामा यांच्यांतल्या भावसंघर्षाचें चित्रण उत्कटपणें झालें आहे. शामाचें अव्याज-मनोहर बोलणें, त्यांतील अर्थाचा व तिच्या आवाजाचा गोडवा आणि











चोटांचे-अंगाचे स्पर्श सुद्धां जिवंतपणें वठविले गेले. ते इतक्या प्रभावानें कीं शामा रंगरूपाला कशी होती, उंची-बांध्यांत, वेषभूषेंत कशी होती हें कोठेंहि आलें नाहीं तरी तिच्या संभाषणांनीं, तिच्या लुटुपुटीच्या खेळांनीं तिचा आकार पुसट रीतीनें पण प्रत्यय येईल या पद्धतीनें स्पष्ट केला म्हणूनच कथेला ' शामा ' हें शीर्षकसुद्धां योग्य ठरलें असतें.

श्री. शांताराम यांच्या कथांतील भावचित्रण सूक्ष्मपणें व वेधकपणें केलेलें असतें. मनःस्थितीच्या चित्रणाचा उत्कृष्ट नमुना म्हणून शिरवा, नशा, वाढवेळ, अनर्थ, शिंग इत्यादि कथा वाचण्याजोग्या आहेत. प्रौढपणाचें आवरण फोडून काव्यवृत्ति कशी थरथरत येते व प्रौढत्वांतच परत सांकळून जाते याचें सुंदर दर्शन ' शिरवा ' कथेंत आहे. नशामधली धुंदी शब्दाशब्दांत भिनली आहे. अप्रकट मन आणि व्यवहार सांभाळूं बघणारें प्रकट मन यांतली लपाछपी या कथेंत मनोहरपणें व्यक्त झाली आहे. ' शिंग ' मधल्या सांबराच्या मनांत व शरीरांत निर्माण होणाऱ्या ऊर्मि कुशलपणें टिपल्या. जुळवणीमधला तो आणि ती यांची अवघडलेली, अगतिक अवस्था प्रत्ययकारक रीतीनें व वास्तव दृष्टीनें चितारली. या कथांतील हे भाव उत्कटपणें चितारले गेलेच परंतु त्यांच्या चित्रणांत जो कलात्मक संयम आला आहे तो वाखाणण्याजोगा आहे. कथेंत उत्कटता येते परंतु उत्कटतेमागें लागून वाचकाच्या मनोवृत्तीचा घांस घेतला जात नाहीं.

श्री. शांताराम यांच्या कथांतील भावचित्रण निसर्गाच्या एखाद्या अवस्थेच्या आधारानेंच होतें. तें वातावरण ही एक प्रतिमाच तयार होते. त्यांतहि सायंकाळचें वातावरणच जवळ जवळ सर्व कथांनीं व्यापून आहे. सायंकाळ कधीं दिवसाला नजिक असते तर कधीं रात्रीची सुरुवात असते. परंतु या अंधाऱ्या, गूढ वातावरणाचा लेखकाला फार मोह पडलेला दिसतो. शिरवा, नशा, वाढवेळ, नीति, जुळवणी, धूळ, स्वभाव या सर्व कथांत हें वातावरण प्रामुख्यानें आलें. अनर्थ व श्वान लागे पाठीं या कथांचा शेवट याच वातावरणांत झाला. चित्रणांत वेगळेपणा आहे पण कथांत तेंच वातावरण आल्यानें कथांच्या पृथगात्मतेवर अनिष्ट परिणाम होत असावा.

चिरेबंदी कथा वस्तु व व्यक्तिचित्रणें बाजूस ठेवून कथा उत्कटपणें रंगवतांना, वेधक करतांना कळत न कळत चमत्कृतीचा आधार घेतला जातो. ही चमत्कृति अनेक कथाबीजांच्या मुळांशीं दिसेल. रामचंद्रपंत व त्यांच्या पत्नी यांच्या मनःस्थितींतील उलटापालटींत ती दिसेल. नशा कथेंतील पंडितांच्या मनाच्या स्थित्यंतरांत दिसेल. जुळवणी कथेला शेवटीं धार येते ती या चमत्कृतीमुळेंच. धूळ व प्रत्यय या कथांचे शेवट या चमत्कृतींतच होतात. अनर्थ या कथेच्या सर्वांगांत ती आढळेल. खार ही सुंदर फसवी कथा या चमत्कृतीमुळेंच आवडून जाते. असें वाटतें कीं चमत्कृतीचीं हीं सूक्ष्म वळणें म्हणजेच या भावकथांतल्या उत्कंठावर्धक प्रेरणा होत. कथांचा जिवंतपणा बोथट व्हावा या रीतीनें ही चमत्कृति येत नाहीं हें विशेष आहे.

विशिष्ट भावच्छटांचा व वातावरणाचा प्रत्यय देण्यास श्री. शांताराम यांची शैलीहि फार कारणीभूत होते. लेखकाच्या सौंदर्यदृष्टीचे पैलु या शैलींतूनच प्रत्ययास येतात. लाजरा-बुजरा भाव नाजुकपणें पण स्वच्छपणें व्यक्तविण्याचें सामर्थ्य तिच्यांत आहे. " शहर पेंगत होतं. त्याची रस्त्याची नाडी तेवढी थडथडत होती. माळ जांभया देत अजगरासारखा सुस्त लोळत पडला होता. उन्हानं आपलीं लक्तरं झाडाझाडावर वाळत घातलीं होतीं. त्यांना टरटरा फाडीत वारा मवाल्यासारखा शिट्या फुंकीत भटकत होता." अशा कितीतरी ओळींतून तिचें स्वरूप दाखवितां येईल. संवाद सहज सुंदर आहेत व शैलीच्या ओघांत मिसळून गेले आहेत.

वाढवेळ, श्वान लागे पाठीं, अनर्थ अशा कांहीं कथा वाचतांना प्रा. गंगाधर गाडगीळ यांच्या कथा–घाटणीची आठवण येते. अनर्थ मधला 'तो' बंडूचा जवळचा नातेवाईकच वाटतो. कंटाळा या कथेंतून कंटाळा कसा आला हें दर्शवावयाचें असेल तर तें जमलें आहे! सूचकतेला संदिग्धतेचें स्वरूप आल्यानें प्रत्यय या कथेचा आशय स्पष्ट करून सांगितल्यासच पूर्णपणें कळेल. " जुगारी असूनहि चोरी करतो " या वाक्यांतील कुतूहलांतच नीति ? या कथेचें सारसर्वस्व येतें. कथेचा शेवट सांकेतिकच झाला आहे. ज्या नावीन्यपूर्ण भावचित्रणानें ' शिंग ' ही कथा सुंदर होऊं घातली त्या भावचित्रणाचा नाट्यपूर्ण उत्कर्ष दाखविण्याऐवजीं शिकाऱ्यांकडून सांबर मारविण्यांत कथासौंदर्यच जखमी होतें.

वळण, खार, जुळवणी. नशा, शिरवा अशा अनेक सुंदर कथा लिहून श्री. शांताराम यांनीं मराठीकथेंत मोलाची भर घातली आहे.

—शंकर वि० वैद्य



अनुक्रमणिका

**शैलजा**– वि. के. महाबळेश्वरकर, काण्टिनेण्टल प्रकाशन, पुणें २ (१९५७). पानें ९५. मूल्य ३ रु.

कवीनें गेल्या ३५ वर्षांच्या काळांत लिहिलेल्या कवितांपैकीं निवडक कवितांचा हा संग्रह आहे. या संग्रहांत एकंदर ९३ कविता असून, शिवाय 'जन्मान्तरीं–' या नांवाचें ३२ सुनीतांचें एक खण्डकाव्यहि आहे. या काव्यसंग्रहाला गिरीश यांची प्रस्तावना असून, यशवन्त यांचा एक छोटा पुरस्कारहि आहे. कवीनें आपला हा कवितासंग्रह कै. माधवराव पटवर्धन यांच्या प्रेमळ स्मृतीस अर्पण केला आहे.

अलीकडील नव काव्यांच्या वाचकांना प्रस्तुत 'शैलजा' संग्रहांतील भाव-भावनांच्या आविष्काराचा घाट व थाट वेगळ्या वळणाचा वाटेल. या संग्रहांत नव काव्यांतून आढळून येणारे भावना व जाणीवा यांतील बदल, जीवन उध्वस्त होत असल्याची चाहूल, मानवी संबंधांना तडे जात असल्याची जाणीव, असुरक्षिततेची व अतृप्ततेची भावना आणि या जाणीवा व भावना व्यक्त करण्याकरितां नवीन प्रतीकें शोधून काढावयाची धडपड – या गोष्टी दिसून येणार नाहींत. या कवितासंग्रहाचें विश्व मर्यादित, लहानसें पण सुरक्षित, समाधानी आणि संतुष्ट असें आहे. कवीच्या आविष्काराचीं प्रतीकेंहि परिचित अशीं आहेत. या कवितासंग्रहाच्या लहानश्या अनुभवविश्वांत नांदत असलेला समाधानी, संतुष्ट दृष्टिकोण 'जीवनानंद' (८३ क्र.) या कवितेंत दिसून येतो –

"करा रे विलाप विषाद बंद
लुटूं या निर्मळ जीवनानंद
नितळ, निरभ्र गगन निळें
हिरवीं कुरणें, पोपटी मळे
... ... ...
झऱ्याचें झुळझुळें निर्मळ पाणी
मर्मर–ध्वनि कीं जीवन-गाणी
... ... ...
लुटूं या निर्मळ निसर्गानंद
कशाला विलाप कशाला खेद !"

(या निसर्गानन्दाशिवाय– )

"वाल्मीकि कवीचें अमरकाव्य
शाकुन्तलीं किती माधुरी दिव्य
.........
भास्करकवीचा अमृत-घट
पश्चिमकाव्याचे कुम्भ अवीट
स्वच्छन्द लुटूं या वाङ्मयानंद ॥
.........

(यांच्या जोडीला पुन्हां कौटुंबिक जीवनांतील सौख्य आहेच – )

मातेची ममता नाहींच मिति
पिताजी काळजी वाहती किती
कान्तेशीं कोमल पाशानें बद्ध
बहीण-भावांचें प्रेम विशुद्ध
मोकळें हांसणें, बोबडे बोल—
बाळांचे, त्याला न विश्वांत मोल."

वर उद्धृत केलेल्या कवितेंत वर्णिलेल्या निसर्ग, वाङ्मय, प्रणय, वात्सल्य इत्यादि विषयांशीं कवीची उत्कट समरसता व्यक्त करणाऱ्या कविता या कवितासंग्रहांत आहेत. निसर्गवर्णनपर कवितांबरोबरच श्रेष्ठ वाङ्मयाच्या आस्वादांतून सुचलेल्या विषयांवरहि कविता यांत आहेत. किंबहुना, संस्कृत व इंग्रजी वाङ्मयाच्या रसास्वादपूर्ण व्यासंगाचा संस्कार मंद, सुगंधाप्रमाणें या कवितासंग्रहांतून दरवळत आहे. हा 'शैलजे'चा एक मनोज्ञ विशेष आहे.

'शैलजें'तून विशेष उमटून पडणाऱ्या म्हणजे त्यांतील प्रणयपर व वात्सल्यपर कविता होत. प्रणयाचे व वात्सल्याचे हृत्तंतू छेडण्यांत कवीचें विशेष कौशल्य दिसून येतें. 'शाप कीं वर' (क्र. २३), 'जिवंत होईन' (३९) इत्यादि कविता व 'जन्मान्तरीं–' हें खण्डकाव्य यांमधून प्रणयाच्या सुकुमार छटांचा आविष्कार रम्य कल्पनाविलासानें उजळलेला आहे. 'जन्मान्तरीं–' हें खंडकाव्य त्यांतील प्रणय–भावनेच्या प्रांजळ आविष्कारामुळें आणि विफलतेवर मात करणाऱ्या उदात्तीकरणामुळें हृदयंगम झालें आहे. 'वात्सल्य दे तूं परी !' (३२) 'प्रथम अपत्यदर्शन' (४३) 'वत्सलता' (७०) इत्यादि कवितांतून वात्सल्य उचंबळून आले असून, 'झोंपलेला बाळ' (४५), 'चिमुकली शान्ता' (६३) या कवितांतून कवीनें वात्सल्यपूर्ण जिवंत शब्दचित्रें निर्माण केलीं आहेत.

'शैलजे'च्या तीरावर फेरफटका मारतांना, जरा सभोंवतालच्या असमाधानी, संघर्षमय जीवनापासून दूर गेल्यासारखा विरंगुळा वाटतो आणि अशा 'शैलजे'ला जन्म देणाऱ्या मुग्ध, निरागस, सौंदर्य-संवेदनाशील कविमनोवृत्तीचा हेवा व कौतुक वाटल्याशिवाय रहात नाहीं.

– वि. म. बेडेकर



अनुक्रमणिका

# बाजारपेठेंत, बाजारपेठेंत

— ॲडीपोसेर जातो








माझा भूगर्भात शोध लागल्यानंतर पंपांच्या साह्यानें मला भूपृष्ठावर आणण्यांत येतें
आणि मला शुद्ध करण्यांत आल्यावर अनेक पदार्थांच्या रूपांत मी वावरूं लागतों.
इतकें झाल्यावर माझी बाजारपेठेंत रवानगी होते. तुमची बाजारपेठेची जी रूढ कल्पना
आहे त्या स्वरूपाची ही बाजारपेठ नव्हे, हें मात्र अवश्य लक्षांत ठेवा. रिफायनरींतून मी
तुमच्याकडे म्हणजे ग्राहकांच्या घरीं जातों त्या क्रियेला हे तेल धंद्यांतील लोक मी बाजार
पेठेंत पोंहोंचलों या शब्दांनीं वर्णन करतात. येथून पुढें माझ्या भवितव्याची आंखणी
अत्यंत संघटित अशा लोकांकडून केली जाते. हे लोक ६० वर्षांवर अधिक काल भारताला
उत्कृष्ट दर्जाचे पेट्रोलियम पदार्थ पुरविण्याचें कार्य करीत आहेत.
देशांतील ज्ञात असलेल्या कोनाकोपऱ्यांतील प्रत्येक भागांत लाखों गॅलन गॅसोलीन,
घासलेट आणि औद्योगिक जळणें भारतीय ग्राहकांना पुरविण्याचें कार्य आपल्या चार
प्रादेशिक कचेऱ्या, देशभरच्या मोक्याच्या ठिकाणीं असलेल्या सात विक्री कचेऱ्या, नऊ डेपो
आणि जवळजवळ २००० व्यापारी आणि एजंट यांच्यातर्फे स्टॅन्व्हॅक करीत आली आहे.



**स्टॅनव्हॅक** — म्हणजेच प्रगतीचें प्रेरक प्रतीक

स्टॅण्डर्ड - व्हॅक्यूम ऑइल कंपनी - यू. एस. ए. मध्यें संस्थापित. सदस्यांची जबाबदारी मर्यादित आहे

PSSVOC 61-3/57

अनुक्रमणिका

आ नं दी ◇ बा ल कें ◇ आ नं द दा य क ◇ भ वि ष्य का ळ




राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत




द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

अनुक्रमणिका